# बायकांचें बंड.

हें नाटक

रा. रा. कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर बी. ए.

" कांचनगडची मोहना," " सवाई माधवराव यांचा मृत्यु,"
" कीचकवध, " " भाऊबंदकी, " इत्यादि नाटकांचे कर्ते,
यांनीं लिहून प्रसिद्ध केलें.

तें

रा. रा. शंकर नरहर जोशी

यांनीं पुणें येथें " चित्रशाळा " छापन्यांत छापिलें.

सन १९०९.

किंमत बारा आणे.

# बायकाचें बंड.




## अंक पहिला.

### प्रवेश पहिला.

स्थळ—जंगल. **मैत्रेय व जागरूक** प्रवेश करितात.

**मैत्रे०**—जागरुका, तुझा अवतार माझ्या सारख्या म्हाताऱ्यांना त्रास देण्याकरितां झाला असावा असें मला वाटतें. दुर्योधनादि तामसी राक्षसांना मारण्याकरितां भीमाचा अवतार जसा, भीष्मद्रोकादि अतिरथ्यांना मारून भूमीला झालेला क्षात्रतेजाचा जाच कमी णरण्याकरितां अर्जुन महाराजांचा अवतार जसा, सात्त्विक धर्मबुद्धीची पुन्हा प्रस्थापना करण्याकरितां धर्मराजाचा अवतार जसा, तसा माझ्या म्हातारपणीं देखील मला छळण्याकरितांच, जागरुका, तुझा अवतार झालेला दिसतो!

**जाग०**—कां रे बोवा, मी कसा तुझा छळ करितों?

**मैत्रे०**—अरे कसा म्हणजे काय? मी जितका म्हातारा तितका तूंही म्हातारा, त्यामुळें दिग्विजयाच्या घोड्यावर पहारा ठेवणारा जागरूक बुड्ढा तो मीच असें समजून सर्व सैनिक मलाच घोड्याच्या वर्दी द्यावयाला येतात! युधिष्ठिर महाराजांनीं दिग्विजयाचा घाट घालून घोडा सोडला, व तुला अश्वपालाच्या कामावर नेमलें; त्यावेळेला सर्व सैन्यांत तुझ्या व माझ्या सारख्या म्हातारप-

णामुळें अश्वरक्षक तूं का मी असा घोंटाळा होणार, हें जर माझ्या ध्यानांत आलें असतें, तर मजप्रमाणेंच म्हातारा असलेल्या जाग-रुकाला काढून टाका नाहींतर मला तरी काढून टाका, म्हणून मी हट्ट धरला असता!–दिग्विजयाचा घोडा आज येथें गेला, उद्यां तेथें शिरला, ह्या वर्षाची रिपरिप माझ्या मागें कां? अर्जुनमहा-राजांच्या सैन्यांतले हे अश्वरक्षक मला चावट दिसतात! तूं आणि मी सारखेच म्हातारे आहोंत; म्हणून मला कशाला ह्या घोड्याच्या रडकथा सांगतात कोण जाणें! आतां अर्जुनमहाराज येऊं देत, म्हणजे तुझ्या कामावर दुसऱ्या कोणाची तरी योजना करा म्हणून विनंति करितों.

**जाग०**—मला काढायचा तो तूंच निघून जाईनास?

**मैत्रे०**—माझी बरोबरी करतोस? मी कोण म्हणून समजतोस? मी अर्जुनमहाराजांचा मैत्रेय आहें, मी त्यांचा स्नेही आहें, मित्र आहें, एकूण तुझे मालक जे अर्जुनमहाराज त्यांच्या बरोबरीचा म्हणजे मी तुझा मालक आहें.—मालकाइतकें तुझें म्हातारपण? माझी बरोबरी? अरे दक्षिणेचा पराभव करून अर्जुनमहाराजांनीं पश्चिमेचा पराभव केला, आणखी आतां पूर्वेकडून आमचा घोडा उत्तरेकडे चालला आहे. ह्या हिमाचलाच्या श्वेतकेतुमहाराजांचा काल पराभव होऊन हिमाचलानें आपली गगनचुंबित पांढरी भिंत आमच्या दिग्विजयाचे घोड्याला दाखवून उत्तर दिशा येथें संपली असें तुला आज स्पष्ट सांगितलेंही आहे. आतां आपला घोडा उद्यां हस्तिनापुराकडे वळेल, व युधिष्ठिर महाराजांना सार्वभौमाच्या सिंहासनावर स्थापण्याचा समारंभ होऊन हा मैत्रेय अन्नाधिकारी होईल. माझी बरोबरी करूं नकोस; नाहीं तर त्या बड्या समारंभाचे

वेळीं लाडवांच्या सिंहासनावर हा मैत्रेय विराजमान झाल्यावर लाडवाचा एक कणही तुझ्या दृष्टीस पडणार नाहीं.

**जाग०**—हस्तिनापूर सोडल्यापासून माझ्यावर तुझा राग दिसतो. ब्राह्मणाला इतका राग उपयोगी नाहीं मैत्रेयभटजी.—अश्वरक्षकाचें काम मी कालच सोडून देणार होतों, पण—

**मैत्रे०**—पण काय झालें?

**जाग०**—हें बायकांच्या बंडाचें नवीन प्रकरण उपस्थित झालें!

**मैत्रे०**—बायकांचें बंड!—बायका कोठें बंडें का करतात?—अरे हल्लींच्या काळीं बंडाचें नुसतें नांव घेतलें तर पुरुष एकजात भीतीनें कांपत उभे राहतात—आणि बायका—मला देखील कांपरें भरलें!

**जाग०**—मैत्रेया, तूं जर प्रमिला महाराणीच्या राज्यांतल्या एकाद्या बाईच्या जन्माला आला असतास तर इतका भ्याला नसतास!

**मैत्रे०**—मी का भिणार? तुला तुझ्या जागेवरून हाकून लावल्यावर अर्जुनमहाराज मला तुझ्या जागेवर नेमणार आहेत व दिग्विजयाच्या घोड्याचें संरक्षण मग मी करणार आहें!—मी जर खराखुरा भित्रा असतों, तर घोड्यावरचा बुद्धा तुला नेमीन, असें अर्जुनमहाराज बोलले तरी असते का?

**जाग०**—अरे आतां तुझ्यासारख्या भित्र्या भागुबाईलाही अश्वरक्षक नेमलें तरी हरकत नाहीं; कारण लढाईचा प्रसंग न आणतां दिग्विजयाचा घोडा सोडविण्याचा अर्जुनमहाराजांचा विचार आहे.

**मैत्रे०**—अरे पण आमचे दिग्विजयाला अडथळा केला आहे कोणीं? मी म्हणतों, आतां चारही दिशांचा दिग्विजय झाला;

घोडा हस्तिनापुराकडे परतायचा तेवढा उरला आहे. दिग्विजया
घोडा घरीं परत मुकाट्यानें चालला असतां अश्वरक्षक बनून मी
थाटानें हस्तिनापुरांत प्रवेश करीन, ह्या उमेदीनें परत जातां
निदान मला अश्वरक्षक नेमा, अशी मीं विनंति केली. हिमाचल
च्या श्वेतकेतुमहाराजांचा अर्जुनमहाराजांनीं पराभव केला, आ
आतां अर्जुनमहाराजांशीं लढणारा पुरुष हिमाचलांत दुसरा को
सापडेलसें मला नाहीं वाटत.

**जाग०**—अरे पुरुष नाहींत, पण बायका आहेत ना? हिमा
लांतल्या बायकांचा पराभव कोठें अर्जुनमहाराजांनीं केला?

**मैत्रे०**—तें काम अस्मादिकांचें!—तरी म्हटलें एवढ्या दिग्वि
यांत माझ्या लायक शत्रु आजपर्यंत कसा भेटला नाहीं!—अर्जु
महाराजांनीं धनुष्यबाणांना आतां खुशाल रजा द्यावी; आणि घोड
वर नजर ठेवण्याचें तुझें अश्वपालकाचेंच तेवढें काम नव्हे,
लढाई करून शत्रूकडून अजिंक्यपत्र घेण्याचेंही आपलें काम म
द्यावें. पाहातों मग तमाशा, कोणची बाई मजपुढें लढायला उ
राहते ती! उगीच नाहीं म्हटलें, द्रोणाचार्य अर्जुनमहाराज
अस्त्रविद्या शिकवीत असतांना कित्येक शब्द ह्या कानावरून
कानाकडे गेले आहेत!

**जाग०**—एका कानांत शिरून दुसऱ्या कानांतून विद्या बा
पडली असती तर निदान संसर्गाचा संस्कार मेंदूवर झाला अस
पण कानावरून जाण्यानें काय होणार?

**मैत्रे०**—अरे जर मी द्रोणाचार्यांची विद्या सगळी ऐक
असती तर अर्जुनमहाराजांहून मोठा वीर झालों असतों.—
म्हटलें सध्यां अर्जुनमहाराजांच्या बरोबरीचा मैत्रेय आहे, पुरे झा
इतकी विद्या—पण कायरे, ह्या हिमाचलांतल्या बायकांनीं आम

घोडा पकडला आहे म्हणतोस ? मग ह्या बायका श्वेतकेतुमहाराजांचें ऐकत नाहींत ?

**जाग०**—मी तेंच सांगतों आहेना ?—ह्या बायकांनीं श्वेतकेतुमहाराजांविरुद्ध—किंबहुना सर्व पुरुषांविरुद्ध—बंड केलें असून ह्या टेंकडीपलीकडे स्वतंत्र स्त्रीराज्य स्थापिलें आहे.

**मैत्रे०**—हें कोणचें स्त्रीराज्य ? प्रत्येक घरांत पुरुषांचें चालूं न देण्याकरितां बायकांचें एक स्वतंत्र स्त्रीराज्य आहेच; आणि ह्या हिमाचलाच्या थंडींत दुसरें कोणचें स्त्रीराज्य उद्भवलें ?

**जाग०**—श्वेतकेतुमहाराजांची मुलगी प्रमिला हिनें हें स्त्रीराज्य स्थापिलें आहे. श्वेतकेतुमहाराजांच्या मनांत प्रमिलेला अर्जुनमहाराजांना द्यावयाचें होतें; पण जितके म्हणून पुरुष तितके दर्शनालाही योग्य नाहींत, असें प्रमिलेच्या मनांत तिच्या सत्यमाया नांवाच्या मावशीनें भरविल्यामुळें तिनें हें नुसत्या बायकांचें राज्य स्थापिलें आहे. ह्या स्त्रीराज्यांत तिच्या बापाचा परवाना असल्याशिवाय कोणाही पुरुषाला जाण्याची परवानगी नाहीं; आणि आमच्या दिग्विजयाचा घोडा तर असल्या स्त्रीराज्यांतल्या बायकांनीं पकडला आहे.

**मैत्रे०**—बरें झालें !—हें प्रकरण एकंदरीनें बरें उपस्थित झालें!—हें पहा, जागरुका, ह्या बायकांशीं लढण्याचें काम बहुतेक आमच्याच गळ्यांत पडणार, तेव्हां तुला कांहीं अश्वरक्षकाच्या जाग्यावरून मी दूर करीत नाहीं.—पण कायरे, तरुण वीरांशिवाय इतरांशीं आम्ही लढत नाहीं, असें जर प्रमिला म्हणाली तर मला तरुणाचें सोंग घ्यावें लागेल नाहीं ?

**जाग०**—हे पहा अर्जुनमहाराजच इकडे येत आहेत. त्यांना

विचार म्हणजे बायकांशीं लढतांना कोणत्या सोंगाची बतावणी करावी लागेल तें तुला समजेल.

[ अर्जुन, पुष्पधन्वा, श्वेतकेतु, गुरु, पुरोहित, वगैरे येतात. ]

**अर्जु०**—श्वेतकेतुमहाराज, या तसबिरींतल्या आपल्या मुलीचें रूप आणखी यौवन पाहून इंद्रलोकीं पाहिलेल्या अप्सरा मला विद्रूप वाटतात. इंद्रलोकीं उर्वशी अप्सरेनें आपल्या प्रेमपाशांत मला गुरफटण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, पण ह्या अर्जुनाला वश करण्याचें सामर्थ्य नंदनवनांतल्या कोणच्याही अप्सरेच्या अंगीं नाहीं, असें मीं उर्वशीच्या अनुभवास आणून दिलें.—पण ह्या प्रमिलेची ही तसबीर पाहिल्यानंतर देवांगनांहूनही मानवी सुंदरी अधिक श्रेष्ठ आहेत, अशी माझी खात्री झाली.—जसजसा मी ह्या तसबिरीकडे अधिक पहातों तसतसें माझें मन मला निक्षून सांगतें कीं, दिग्विजयाचा घोडा स्त्रीराज्यांतून बाहेर काढण्याकरितां प्रमिलेच्या विरुद्ध कोणाही पुरुषाला आपलें धनुष्य वाकावितां येणें शक्य नाहीं !

**मैत्र०**—पण धनुष्य वांकवून लढाईला मी तयार आहेना !

**जाग०**—पाठीच्या कण्याचा तिरकमठा लढाईंत उपयोगीं पडत नसतो.

**श्वेत०**—अर्जुनमहाराज, माझ्या मुलीचे सद्गुण तिच्या रूपाहून अधिक किंमतीचे आहेत. आणखी आपल्यासारख्या धनुर्धराची बायको व्हावयाला ती सर्वतोपरी योग्य आहे. पण मी काय करूं? तिच्या मनावर सत्यमायेचा पगडा बसल्यामुळें, तिनें स्त्रीराज्य स्थापून आम्हां सर्व पुरुषांविरुद्ध बंड केलें आहे.—एकुलती एक मुलगी, सद्गुणी, रूपवान, मोठी झाली म्हणजे आपोआप तिचें

तिला समजूं लागेल, असें म्हणत मी आजपर्यंत गप्प बसलों; आणि माझ्या हातून हें बंड कांहीं मोडवलें नाहीं.

**गुरु०**—प्रमिलाताईसाहेबांना योग्य वर आढळल्यावर त्यांच्या कडूनच हें बायकांचें बंड मोडविण्याचा विचार होता. आणि दिग्विजयाच्या निमित्तानें आपलें येणें ह्या देशांत झाल्यामुळें परमेश्वरानेंच तो योग जुळवून आणला आहे, असें म्हटलें पाहिजे.

**पुरो०**—तेव्हां श्वेतकेतुमहाराजांच्या तर्फे मी अर्जुनमहाराजांना विनंति करितों कीं, हें काम मनावर घेऊन, हें स्त्रीराज्य मोडून, प्रमिलाताईसाहेबांना आपली राणी करून सरकारांना म्हातारपणीं कृतकृत्य करावें.

**अर्जु०**—पुरोहितजी, आपली विनंति मी मोठ्या आनंदानें पत्करितों.

**पुष्प०**—श्वेतकेतुमहाराजांनीं प्रमिलाराणीसाहेबांना देण्याकरितां आमच्यापाशीं परवान्याचीं पत्रें द्यावींत, म्हणजे आम्ही आपल्या उद्योगाला लागूं.

**श्वेत०**—हीं पत्रें घ्या. तुमच्या कामाला ह्या पत्रांनीं चांगली मदत होईल.

**अर्जु०**—ह्या पत्रांत चार पांच इसमांची परवानगी लिहिली आहेना? मी असें करावें म्हणतों, मला प्रमिलेनें किंवा दुसऱ्या कोणींही पाहिलेलें नाहीं; तेव्हां अर्जुनाचा वकील म्हणून मीच तेथें गेलों तर मला कोणी ओळखणार नाहीं. पुष्पधन्वा मूळचे ह्याच प्रदेशांतील राहणारे असल्यामुळें ते सर्वांच्या ओळखीचे आहेत; तेव्हां ते म्हाताऱ्याचें सोंग घेतील. हे दोघे माझे म्हातारे मित्र, आणखी आम्ही दोघे, असे चौघे पांचजणच मिळून बायकांचें बंड मोडूं म्हणतों. तेव्हां पत्रांत चार पांच इसमांचे परवाने लिहिले आहेत ना?

**श्वेत०**—अर्जुनमहाराज, ह्या पत्रांत पांच इसमांचे परवाने लिहिले आहेत. तुम्ही म्हातारे जा, किंवा तरुण जा, हें पत्र तुमच्या जवळ असल्यावर तुम्हाला कोणी हरकत करणार नाहीं. पत्रांत वकील असें मोघम लिहिलेलें असल्यामुळें तुमच्या बेताला आड-काठी येणार नाहीं.

**अर्जु०**—श्वेतकेतुमहाराज, आतां आपण कोणत्याही प्रकारची काळजी करूं नये. हें बायकांचें बंड मोडून थोड्याच अवकाशांत आपल्या मुलीसह मी आपल्या दर्शनाला येईन.

**गु० व पु०**—आमच्या महाराजावर आणि आमच्या देशा-वर आपले अनंत उपकार होतील.

**पुष्प०**—श्वेतकेतुमहाराज, आतां यापुढें आम्हाला पोंचवायाला येण्याची आपण तसदी घेऊं नये. बोलत बोलत फार लांबवर आलों.

**अर्जु०**—आतां आपण आपल्या नगरीकडे परत जावें.-आम्ही आमच्या छावणीकडे जातों.

**श्वेत०**—परमेश्वर तुमचें कल्याण करो, व ह्या कार्यांत तुम्हाला यश मिळो.-आम्ही परततों तर आतां.-चलावें गुरुमहाराज, पुरो-हितजी, चलावें.

**गुरु०**—हस्तिनापूरच्या सैन्याचा जय होऊन स्त्रीराज्य मोडून जावो.

**पुरो०**—अर्जुनमहाराजांचा जयजयकार असो, आणि अर्जुन-प्रभिलेच्या विवाहसमयीं श्वेतकेतुमहाराजांच्या नेत्रांतून आनंदाश्रू वाहोत.

**गु० व पु०**—चलावें महाराज; आम्ही परततों आतां.

[ **श्वे० गु० पु०** जातात. ]

मैत्रे०—हें पहा, सरकार, प्रमिला मुकाट्यानें वश झाली तर बरेंच झालें, नाहीं तर लढाई करून दिग्विजयाचा घोडा सोड-विण्यास मी कांहीं मागें पुढें पाहणार नाहीं.—सरकार, आपण लढाई करणार नाहींना?

अर्जु०—मी साफ युद्ध करणार नाहीं.—बायकांच्या विरुद्ध अर्जुन रणांगणावर उभा राहिला अशी माझी अपकीर्ति होता कामा नये. प्रमिलेची व माझी प्रत्यक्ष गांठ तर पडूं द्या, लग्न न करण्याचा तिचा निश्चय किती वेळ टिकतो तें तर पाहूं.

मैत्रे०— मग असें करा, तें धनुष्य करा माझ्या स्वाधीन.—प्रमिलेच्या फंदांत तुम्ही सांपडलात म्हणून युधिष्ठिरमहाराजांचा दिग्विजय कांहीं आम्हांला बंद ठेवायचा नाहीं.—द्या तें धनुष्य (अर्जुन धनुष्य मैत्रेयाच्या गळ्यांत अडकवितो.) प्रमिला आपल्याशीं लग्न करावयाला लवकर तयार झाली तर बरें, नाहीं तर ह्या धनुष्याचा बागुलबुवा बायकांना दाखवून घोडा मला सोडविला पाहिजे.

जाग०—मैत्रेयभटजी, हातांतली काठी नीट उचलण्याची शक्ति अंगांत नाहीं आणि हें धनुष्याचें लोढणें गळ्यांत कशाला?

मैत्रे०—बेट्या जागरुका, अर्जुनमहाराजांच्या धनुष्यानें मजसारखाही वीर इतका वांकलेला पाहून ह्या धनुष्याचें वजन किती आहे, हें सर्व बायकांना समजेल; आणि ह्या वजनाचे भयानें त्या बाया लढाईचा प्रसंगच आणणार नाहींत.—पण महाराज, लढाई जरी झाली नाहीं तरी दिग्विजयाचा घोडा ह्या मैत्रेयानें स्त्रीराज्यांतून सोडविला अशी माझी बहादुरकी युधिष्ठिरमहाराजांपाशीं सांगितली पाहिजे; नाहीं तर आपल्या ह्या धनुष्याचें ओझें स्त्रीराज्यांत मी अंगावर घेणार नाहीं.

अर्जु०—बरें, आपल्याच शौर्याची वाहवा आम्ही हस्तिनापुरांत करूं.

मैत्रे०—महाराज, हें वचन मात्र विसरूं नका; नाहीं तर ओझ्याचा तेवढा गाढव मी ठरेन.

अर्जु०—सेनापती, तुम्हींही म्हाताऱ्याचेंच सोंग घेतलें पाहिजे; कारण माझ्या सभोंवती म्हाताऱ्यांचा गराडा आहे, असें पाहिल्या शिवाय प्रमिलेची मावशी सत्यमाया जितकी बेसावध रहावयास पाहिजे तितकी राहणार नाहीं. तेव्हां असें करूंया म्हणतों, म्हाताऱ्याचें सोंग घेऊन ह्या दोघांना बरोबर घेऊन तुम्ही प्रथम स्त्रीराज्यांत शिरा; व माझे वकील शिष्टाई करण्याकरितां येताहेत अशी प्रमिलेला वर्दी द्या.—चला, छावणीकडे जाऊन हा बेत मुक्रर ठरवूं.

[ **अर्जुन, पुष्पधन्वा, मैत्रेय, जागरूक** जातात. ]

---

# प्रवेश दुसरा.

—*):(*—

**स्थळ**—स्त्रीराज्यांतील वेस. **बुद्धिमती, वाग्मती** दोघी हातांत तरवारी घेऊन पहारा करीत आहेत.

बुद्धि०—गडे वाग्मती, ह्या अशा कडाक्याच्या थंडींत, आणि इतका सक्तीचा पाहरा कशालाग पाहिजे ?

वाग्म०—अग कोतवालीचा हुकूम झालेला माहीत नाहीं का ? स्त्रीराज्यावर पुरुषांचें परचक्र येण्याचा संभव आहे हो बुद्धिमती !

बुद्धि०—खरेंचका लढाईचा संभव आहे ? कोण मेले आमच्या स्त्रीराज्यावर चाल करून येणार आहेत ?

वाग्म०—हस्तिनापुराला धर्मराज ह्या नांवाचा एक पुरुष राज्य करीत असतो.

बुद्धि०--मेल्या ह्या पुरुषांचेंच जेथें तेथें राज्य ! आमच्या-शिवाय दुसरीकडे कोठेंही बायकांचें राज्य नाहींना !

वाग्म०--कोठेंही नाहींहो बुद्धिमती ! आमच्या राज्याबाहेर चोहोंकडे मेल्या पुरुषांचें राज्य, जेथें तेथें बायका पुरुषांच्या गुलाम, आणि कोठें पळून जाईन म्हटलें तर बायकांना पुरुषांशिवाय थाराही नाहीं म्हणे !

बुद्धि०--खरें बोलायचें किं नाहीं म्हणजे, गडे वाग्मती, आम्ही बायकाच चोंबड्या, चहाडखोर, लोभी आणि खुनशी; सवतीमत्स-रानें आपआपसांत भांडून आम्हीं आमच्या हातांनींच पुरुषांचें वर्चस्व स्थापिलें ! केव्हां गडे आम्हां बायकांची एकी होईल आणि या मेल्या पुरुषांचें पृथ्वीवर बीजन होईल तेव्हां बाई खरें !

वाग्म०--तो सोन्याचा दिवस उगवेल तेव्हां खरें; पण आतां हास्तिनापूरच्या त्या मेल्या पुरुषराजाच्या मनांत जगांतील सर्व राज्यें जिंकण्याचें आलें आहे, आणखी त्याचे दिग्विजयाचें सैन्य आमच्या राज्याजवळ येऊन उतरलें आहे म्हणे !

बुद्धि०--ह्या सैन्यांत सगळेच मेले पुरुष असतील ! कांहीं बायका आहेत काग ?

वाग्म०--बायका मुळींच नाहींत ! पुरुष मेले नेहमीं आपल्या जातीचा कैवार घ्यावयाचे.

बुद्धि०--एक देखील बाई नाहीं ? आश्चर्य आहे ! ह्या ढाल-गज मेल्याला दिग्विजयच करावयाचा होता तर सैन्यांत सर्व पुरु-षांचीच भरती कशाला केली ? बायका काय त्याच्या राज्यांत नव्हत्या !

वाग्म०--नसायला काय झालें ? पण हे आपलपोटे मेले पुरुष

नायकांना कधीं पुढें येऊं द्यावयाचे नाहींत; जेथें तेथें पुढें पुढें आपण मरतील!—आतां दिग्विजयाचा घोडा म्हणे आपल्या राज्यांत शिरला—

**बुद्धि०**—अगबाई! पुरुषग मेले पुरुष!!

**वाग्म०**—अगबाई! खरेंच काग! मेले पुरुष खरेंच आले काग!

**बुद्धि०**—होयग बाई! खरोखरच मेले पुरुष! वाग्मती, ते पहा, त्या तेथें तीन पुरुष आपल्याकडेच येत आहेत.—तुला दिसतात काग?

**वाग्म०**—मी नाहींग बाई पाहावयाची त्या मेल्यांच्याकडे! तूंच नीट पहा, आणि खरोखरच पुरुष असले तर शिंगें फुंकून सगळ्यांना सावध करूं.

**बुद्धि०**—लांब पांढरें पांढरें—दाढीसारखें—कायसें दिसत आहे. मेले पुरुष का मेले बोकड!

**वाग्म०**—बोकड झाले तरी मेले पुरुषच; गरीब शेळ्या नव्हत.—मी शिंगें फुंकूं का?

**बुद्धि०**—खास पुरुषच ते!—दोन पायावर चालताहेत, बोकड नव्हेत.—अग जवळ येत चालले.—शिंगें वाजवूंया.—तूं प्रथम झंगट वाजीव. [ वाग्मती झंगट वाजविते. ] जवानमर्द बायकांहो, मेले तीन पुरुष दिसूं लागले आहेत, तेव्हां सर्व मर्द बायकांनीं आपआपलीं शस्त्रें घेऊन पाहऱ्यावर यावें हो. पुन्हां वाजीव झंगट.

[ द्वाही व शिंगें पूर्वोक्त. ]

[ म्हाताऱ्याचें सोंग घेतलेला **पुष्पधन्वा**, गळ्यांत धनुष्य अडकविलेला **मैत्रेय** व **जागरूक** येतात. ]

**वाग्म०**—[ तरवार पुढें करून ] तुम्ही कोणत्या जातीचे आहांत? परममायेनें तुम्हांला श्रेष्ठ व सुंदर स्त्रीजातींत जन्माला घातलें असून,

तुमचे वडील चांडाळ पुरुषजातीचे होते, ह्या पापाची खूण ह्मणून तुमच्या चेहऱ्यावर पांढरे केस उगवले आहेत, का तुह्मी खरोखरीच—

**जाग०**—आम्ही पुरुष आहों.

**मैत्रे०**—मी देखील पुरुषच आहें.

**वाग्म०**—मेले खरोखरीच पुरुष आहेत! आतांग कसें करायचें ?

**बुद्धि०**—त्या तेथें कोपऱ्यांत तोंड फिरवून उभे रहा. आमचे कोतवाल रुद्रमाया येथें आल्यावर तुमची चौकशी करण्यांत येईल.

**मैत्रे०**—जागरुका, स्त्रीराज्यांत बायका भिंवयांचें धनुष्य करून मदनाचे विषारी बाण सोडून पुरुषांना घायाळ करितात, असें मीं ऐकिलें होतें. आपण खरोखरीचेच म्हातारे, तेव्हां ह्या शस्त्रांनीं आम्ही कसचे घायाळ होणार! म्हणून शुक्राचार्यांच्या धिटाईनें मी येथें आलों. पण जागरुका, ह्या बायकांच्या हातांत खरोखरीच्या तरवारी! आमचे पांढरे केस कामाच्या तरवारीपासून आमचें रक्षण करतील, पण ह्या बिचाऱ्यांचें पोलादाच्या तरवारीपुढें काय चालणार!

**बुद्धि०**—वाजीवग पुन्हा झंगट [ झंगट दवंडी, शिंगें पूर्वोक्त. ]

**मैत्रे०**—जागरुका, आपली कांहीं धडगत दिसत नाहीं. मीं अर्जुनमहाराजांपासून धनुष्य मागून घेतलें, पण बाण मागून घ्यावयाचें विसरलों; त्यामुळें बायकांहूनही बायका होण्याचा प्रसंग आपणावर येणारसें दिसतें.

[ **रुद्रमाया** व बायकांचें सैन्य प्रवेश करितात. ]

**रुद्र०**—कोठें आहेत आमचे शत्रू ?

**बुद्धि०**—ते मेले त्या तेथें उभे आहेत.

रुद्र०—जवान, शूर, वीर, मर्द बायांहो, स्त्रीराज्याच्या ह्या तीन शत्रूंना प्रथम गिरफ्दार करा.—ह्यांना कैद करतांना यांच्या डोळ्यांतल्या त्या विषारी चमकेची तुम्हाला बाधा होऊं नये ह्मणून यांच्या डोळ्यांकडे तुह्मी पाहूंच नका. [ बायका कैद करितात. ] दुष्टांनो, चांडाळांनो, अधमांनो, तुम्ही आतां आमचे गुलाम आहां.—ह्या स्त्रीराज्यांत प्रवेश करण्याबद्दल स्त्रियांचे कैवारी श्वेतकेतुमहाराज यांचीं पत्रें तुमच्यापाशीं आहेत का ?—गांजांत जशी तुळस निपजते तसे हे आमचे श्वेतकेतु मेल्या पुरुषांत जन्मले आहेत.—हे शरीरानें पुरुष असले तरी मनानें बायकांतच त्यांची गणना होते.—श्वेतकेतुमहाराजांचीं पत्रें तुमच्या जवळ असलीं, तर तुम्हांला आह्मी राणीसाहेबांच्या पुढें नेऊं; नाहीं तर यापलीकडच्या कड्यावरून तुमचा कडेलोट करण्यांत येईल.

मैत्रे०—स्वातंत्र्यप्रिय, शूर, वीर, मर्द बायांहो, इतक्या निर्दयपणानें आमच्यांशीं वागूं नका.

जाग०—या जन्मीं आम्ही चुकून पुरुष झालों आहोंत, पुढच्या जन्मीं पुन्हा कधीं पुरुष होणार नाहीं.

मैत्रे०—एवढा जन्म आम्हांला माफ करा. पुन्हा जर आम्ही पुरुषाच्या जन्माला आलों तर मग तुम्ही सर्व बायका कट करून गर्भांतल्या गर्भांतच आह्मांला मारून टाका; त्या वेळीं मी तक्रार करणार नाहीं! शिवाय पुरुषांना मोठे वाढूं देऊन म्हातारपणीं त्यांचा कडेलोट करण्यापेक्षां गर्भांतल्या गर्भांत पुरुषांना चिरडून मारणें बायकांच्या हातचा मळ आहे.

बुद्धि०—बायकांनीं यांपूर्वींच पुरुषांचें असें बीजन केलें असतें, पण पुरुष कीं बायको हें गर्भांत ओळखूं येत नाहीं ना ?




रुद्र०—नाहींतर या पलिकडच्या कड्यावरून कडेलोट करण्यांत येईल. (पृ. १४)

**जाग०**—हीं घ्या पत्रें. [**वाग्मती रुद्रमायेला** पत्रें देते व ती वाचते. ]

**बुद्धि०**—मेले आमच्यावर छापा घालायला आले नव्हते हो!

**वाग्म०**—मेल्या पुरुषांनीं किती छापे घातले म्हणून आम्ही बायका का फसणार आहोंत?

**रुद्र०**—जवान बायकांहो, या कैद्यांना महाराणीसाहेबांच्या महालाकडे घेऊन चला. [ प्रत्येकाच्या पुढें दोन व मागें दोन बायका अशा रितीनें सर्व वेशींत प्रवेश करितात. ]

---

# प्रवेश तिसरा.

### स्थळ—प्रमिलेचा दरबार.

**प्रमिला** सिंहासनावर बसली आहे, दासी चौऱ्या वारताहेत, नंग्या तरवारी हातांत घेऊन **बुद्धिमती** व **वाग्मती**, उजवे बाजूस **सत्यमाया** व **स्थिरमाया**, डाव्या बाजूस **रूपमाया** व **रुद्रमाया**, असा देखावा.

**प्रमि०**—गुरुमहाराज सत्यमायाबाई, प्रधानजी स्थिरमाया, सेनापति रूपमाया, कोतवाल रुद्रमाया व इतर मंत्रिणीहो, स्त्रीराज्यावरचा आजचा प्रसंग आमच्या राज्याच्या इतिहासांत अत्यंत महत्त्वाचा आहे. बाबांच्या पहिल्या पत्रांत, त्यांचा पराभव हस्तिनापूरच्या सैन्यानें कसा केला आणि आम्ही जर अर्जुन नांवाच्या त्या मेल्या पुरुषाशीं लग्न करायला तयार झालों तरच बाबांचें राज्य बाबांना कसें परत मिळणार आहे, याचें बाबांनीं वर्णन केलें असून---

**सत्य०**—स्त्रीराज्याच्या प्रमिलामहाराणीचें लग्न आणि तें एका पुरुषाशीं—अशक्य—अशक्य—अशक्य! भगवती राजराजे-

श्रृंगी, त्रिलोकमर्दिनी, आदिमाये, स्त्रीराज्यावर असा प्रसंग आणूं नको.—प्रमिले, रूपमाये, तुमच्या सारख्या स्वातंत्र्यप्रिय बायकांनीं त्या मेल्या अर्जुनाशीं किंवा पुष्पधन्व्याशीं लग्न लावलें तर तुमचें स्वातंत्र्य कायम राहील, असें मनांत देखील आणावयाला नको. प्रमिले, रूपमाये, तुह्मी बायकांच्या जन्माला या, किंवा पुरुषांच्या जन्माला जा, लग्नाची श्रृंखला तुमच्या पायांत पडली म्हणजे तुम्ही परतंत्र झालाच ! मग तें लग्न जन्मभर टिकणारें असो अगर पाहिजे तेव्हां तोडलें जाऊन पाहिजे तेव्हां सांधलें जाणारें असो.—शिवाय, प्रमिले, तुझें लग्न त्या मेल्या अर्जुनाशीं झालें तर लग्नाच्या पारतंत्र्याचीं दुःखें अर्जुनापेक्षां तुलाच अधिक निस्तरावीं लागतील. म्हणून अर्जुन जरी लग्न करायला उत्सुक झाला, पुष्पाप्रमाणें तळहातावर तुला झेलून धरीन अशीं गोड वचनें त्यानें तुला कितीही दिलीं, किंवा आज हा नवरा तर उद्यां तो नवरा अशा चंचल वृत्तीची परवानगी देऊन जंगली, उग्र व कडवट फुलांपासूनही मध गोळा करणाऱ्या मधुमक्षिकेच्या गुंगण्याचा सुखाभास उपभोगायला ह्या मेल्या पांडवसेनेंतील वीरांनीं, प्रमिले, रूपमाये, तुह्मांला किती जरी भुलविलें, तरी लग्न ह्मणजे पारतंत्र्य आहे, हें पक्कें लक्षांत ठेवा. एकदां तुह्माला लग्नाची गोडी लागली ह्मणजे तुम्ही पांडव सेनेंतील वीरांच्या पक्क्या गुलाम झालांत असें समजा.—रुद्रमाये, एक नवरा सोडून तुम्ही पाहिजे तेव्हां दुसरा नवरा केला तरी कोणा तरी मेल्या पुरुषाच्याच पायाची दासी होऊन तुम्हाला पारतंत्र्यांतच दिवस काढावे लागतील, हें ध्यानांत घेऊन पांडवांच्या शिष्टाईला आपल्या मनांत बिलकुल थारा देऊं नका.

**प्रमि०**—बायका कधीं काळीं या मेल्या पुरुषांचे नवरे होतील हें मनांत देखील आणायला नको. गुरुमहाराज, आपली शिष्यी-

ण ही प्रमिला अर्जुनाचा नवरा व्हावयाची नाहीं, किंवा रूपमाया पुष्पधन्व्याचा नवरा होणें शक्य नाहीं म्हणूनच पुरुषांना आम्ही आमचे राज्यांत राहूं देत नाहीं.

**स्थिर०**—हे पुरुष आमच्या राज्यांत नकोत खरे, तरी श्वेतकेतुमहाराजांचा सल्ला विचार करण्यासारखा आहे.—बाकी या दरबारांत लग्नाची भाषाही बोलतां कामा नये.

**रूप०**—रणमैदानावर पाहिजे तर मी पुष्पधन्व्याशीं युद्ध करीन, पण त्या मेल्या पुरुषाची बायको म्हणवून घेऊन राहणें, नकोग बाई त्या मेल्या पुष्पधन्व्याचें दर्शन देखील नको.

**रुद्र०**—या मेल्या पांडवांनीं बायकांना जनानखान्यांत कोंडून ठेवलें आहे त्याप्रमाणें पांडवांनाही मर्दानखान्यांत कोंडून ठेवण्याइतकें स्त्रीस्वातंत्र्य स्थापण्याची पुण्य कामगिरी आदिमायेच्या प्रसादानें आमच्या महाराणीसाहेबांच्या हातून पार पडल्याशिवाय पुरुषांचा संपर्कही या स्त्रीराज्याला होऊं देतां कामा नये.

**वाग्म०**—इडापिडा टळो आणि पुरुषराज्यांतल्या कोणाही बाईच्या गर्भांत मेले पुरुष जन्मालाच न येवोत !

**बुद्धि०**—इडापिडा टळो आणि पुरुष जर जगाला पाहिजेच असतील तर पुरुषांचा गर्भ पुरुषांच्याच पोटांत वाढो.

**स्थिर०**—महाराणीसाहेब, श्वेतकेतुमहाराजांची आणखी कोणती आज्ञा आहे ?

**प्रमि०**—बाबांनीं आणखी असें लिहिलें आहे कीं, हस्तिनापूरच्या तर्फेचे वकील व त्यांचे पुरुष सल्लामसलतगार येतील त्यांचा योग्य सत्कार करून त्यांचे बोलणें ऐकून घ्यावें. स्त्रीराज्याविषयीं अर्जुनमहाराजांच्या मनांत कोणच्याही प्रकारची वाईट बुद्धि नसल्यामुळें स्त्रीराज्याची इभ्रत कमी न करितां पांडवांचें वर्चस्व कबूल

करून दिग्विजयाचा घोडा कसा आम्हाला सोडून देतां येईल, व स्त्रीचरित्राला कलंक न लावतां बरोबरीच्या नात्यानें त्या मेल्यांशीं विवाह कसा करितां येईल, ह्याविषयीं ते वकील बोलणें लावणार असल्यामुळें त्यांना दहा पंधरा दिवस ठेवून घेऊन, मन मोकळें करून बोलाचालायला त्यांना संधी द्यावी, असें बाबांचें म्हणणें आहे.

[ द्वारपालिका प्रवेश करिते. ]

**द्वार**०—सरकार, हस्तिनापूरच्या पुरुषराज्याचे दोन वकील व त्यांच्या बरोबरचे दोन म्हातारे आले असून सरकारच्या हुकुमाची वाट पहात आहेत.

**प्रमि**०—त्यांना आंत येऊंदे. [ वकिलाच्या वेषानें **अर्जुन** म्हाताऱ्याचें सोंग घेतलेला **पुष्पधन्वा**, गळ्यांत धनुष्य अडकाविलेला **मैत्रेय** व **जागरूक** प्रवेश करितात. त्यांच्याबरोबर दोन सशस्त्र स्त्री पहारेकरी येतात. वकील व म्हातारे महाराणीला मुजरा करितात. त्यांना बसावयास **प्रमिला** खुणावते. ]

**प्रमि**०—वकीलसाहेब, व इतर पुरुषहो, बायकांना गुलामगिरींत राबायला लावण्यास सोकावलेल्या पुरुषजातीला आमच्या ह्या स्त्रीराज्यांत पाऊल ठेवल्यापासून कसेसेंच वाटत असेल नाहीं? ज्या स्त्रीजातीला पुरुष पायांतलें खेटर समजत आले आहेत त्या स्त्रीजातीच्या अंगीं स्वतंत्रपणानें राज्यव्यवस्था चालवून, स्त्रीराज्याचें सैन्य तयार करून, तुमच्या हस्तिनापुरासारख्या बलाढ्य साम्राज्याच्या दिग्विजयाचा घोडा अटकेंत ठेवण्याचें सामर्थ्य उत्पन्न होणें शक्य आहे, ही गोष्ट आजचा प्रत्यक्ष अनुभव येईतो तुम्हांला खरी तरी वाटली असती का?

**पुष्प**०—स्त्रीराज्याचें हें सामर्थ्य व हें वैभव पाहून आम्हांला, महाराणीसाहेब, बिलकूल वाईट वाटत नाहीं. उलट ह्या सशस्त्र स्त्रीसैनिकांचें कौतुक वाटतें, व स्त्रियांच्या ह्या वैभवाचा आम्हांला अभिमान वाटतो.

रूप०—दिग्विजयाचा घोडा आम्ही बायकांनीं अटकेंत ठेवला च त्या मेल्या अर्जुनाशीं किंवा पुष्पधन्व्याशीं रणांगणावर युद्ध करायला आम्ही तयार झालों, हें ऐकून तुह्मां पुरुषांना वाईट वाटल्यावांचून कसें राहील ?–आपलें दुःख केविलवाण्या तोंडानें प्रगट करण्याची तुह्मा पुरुषांना संवय नसते, त्यामुळें हांसतमुखाचें सोंग तुम्हांला चांगलें आणतां येतें.

वाग्म०—पोटांत एक आणि चेहऱ्यावर भलतेंच, अशी ही पुरुषांची मेली फसवी जात !

रुद्र०—पुरुष मेले सोंगाडे ! ह्यांचा लहानपणीं चेहरा बायकासारखा असतो, तरुणपणीं मेले तोंड काळें करतात, आणि वृद्धपणीं तरुणपणाच्या काळ्या पापावर सफेता चढवितात. एका आयुष्यांत चेहऱ्याचे तीन रंग !

बुद्धि०—बायकांचा चेहरा कसा लहानपणापासून मरेपर्यंत जशाचा तसा ! मिशी नाहीं, दाढी नाहीं, काळें नाहीं, पांढरें नाहीं, कांहीं नाहीं. पुरुष मेले पक्के सोंगाडे !

मैत्रे०—( स्वगत ) ओळखलं वाटतें ह्यांनीं ! आतां ह्या दाढीची फजिती आहे.

अर्जु०—महाराणीसाहेब आम्ही हांसतमुखाचें सोंग आणलें नाहीं; तर स्त्रियांच्या दरबारचें हें सौंदर्य पाहून आह्मांला खरोखर कृतकृत्य वाटत आहे. हस्तिनापूर सोडल्यापासून आह्मांला कितीतरी राज्यें लागलीं, आणखी प्रत्येक दरबाराशीं लढाईची किंवा शिष्टाईची घासाघीस पडलीच. प्रथम शिष्टाई करायला दरबारांत जा, किंवा नंतर लढाई करण्याकरितां रणमैदानावर उभे रहा, जेथें तेथें पुरुषांशीं गांठ; बसावयाचें तरी सभोंवार पुरुषच,

बोलावें तरी पुरुषांशींच, लढावें तरी सामनेवाले पुरुषच! एकच गोष्ट एकसारखी करीत असल्यानें जसा वीट येतो त्याप्रमाणें या दिग्विजयामध्यें एकसारखे पुरुषच पुरुष जेथें तेथें भेटल्यामुळें, पुरुषमय सर्व सृष्टि आहे कीं काय असें वाटून आमचा जीव आह्मांला नकोसा झाला होता. महाराणीसाहेब, आपल्या या अपूर्व स्त्रीराज्यांत येऊन येथील प्रेममय अमलाखालीं दोन दिवस काढण्याचा प्रसंग आल्यामुळें रुक्ष जगाला कंटाळलेल्या प्राण्यामध्यें पुन्हा जीव आला आहे; व कोरड्या सृष्टींत तडफडणारा मासा पाण्यांत पडला असतां जसा हुषार होतो, त्याप्रमाणें स्त्रीराज्याच्या जादूनें आम्हा सर्वांचे चेहेरे पुन्हा टवटवीत दिसत आहेत.

**मंत्र०**—सरकार, यांत सोंगबिंग कांहीं नाहीं. महाराणीसाहेबांनीं स्वतःच्या मनावरून सृष्टि ओळखावी. विसाव्याची जागा अर्जुनमहाराज आहेत, असें सरकारला जसें केव्हां केव्हां वाटण्याचा संभव आहे, तसें आम्हा पुरुषांना—

**रूप०**—आह्मा बायकांना काय पाहिजे तें वाटत असेल. पुरुषाच्या सहवासाशिवाय सुख नाहीं, असेंही आमचें मन आम्हांला सांगत असेल, पण मनाच्या क्षणैक वासनेला बळी पडून आम्ही आमचें स्वातंत्र्य गमवूं काय?

**अर्जु०**—छे! छे! बायकांनीं काय म्हणून स्वातंत्र्य गमवावें?

**पुष्प०**—बायका परतंत्र होऊन त्यांच्या बायकोपणाचा जर लोप झाला तर सर्व जग रुक्ष होईल.

**जाग०**—बायकाही स्वतंत्र पाहिजेत आणि पुरुषही स्वतंत्र पाहिजेत; पुरुष जर परतंत्र होऊन त्यांच्या पुरुषपणाचा लोप झाला तर सर्व सृष्टीच बंद पडेल.

रुद्र०---बंद पडायला काय झालें? पुरुषांचीं कामें बायका करतील.

वाग्म०—आमचें राज्य असेंच एक सारखें टिकलें तर थोडक्याच दिवसांत साऱ्या पुरुषांना बायका करून सोडूं.

बुद्धि०—आणि मग स्त्रीराज्यातल्या बायका सवाईपुरुष होतील.

मैत्रे०—बायका पुरुष होवोत किंवा पुरुष बायका होवोत, कोणी तरी बायका आणि कोणी तरी पुरुष झाल्याशिवाय नुसत्या बायकांनीं किंवा नुसत्या पुरुषांनीं सृष्टि चालावयाची नाहीं, हें खास.

वाग्म०—नाहीं चालली सृष्टि तर आमचें आडलें आहे खेटर.

बुद्धि०—बायकांनीं बायकांची काळजी करावी; सृष्टीची काळजी आह्मांला काय ह्मणून?

मैत्रे०—सृष्टी बायकांची आहे ह्मणून.

प्रमि०—हा वाद पुरे करा.–वकीलसाहेब, स्त्रीराज्याबद्दल तुमच्या मनांत तिरस्कार नाहीं हें ऐकून आम्हाला संतोष वाटतो. बाबांनीं अर्जुन नावाच्या पुरुषासंबंधानें आणि दिग्विजयाच्या घोड्या संबंधानें, पुष्कळ गोष्टी आपल्या पत्रांत लिहिल्या आहेत, ह्या सर्वांचा शांतपणानें खल करण्याकरितां दहा दिवस स्त्रीराज्यांत राहण्याची आम्ही तुम्हांला परवानगी—

सत्य०—दहा दिवस! महाराणीसाहेब, दहा दिवसांची मुदत फार मोठी होते. शिष्टाईला एक दोन घटका बस झाल्या.– जर दहा दिवसांची मुदत द्यावयाची असेल तर ह्या वकिलाच्या मनांत स्त्रीराज्याबद्दल खरोखर आदर आहे किंवा नाहीं, याची परीक्षा प्रथम पाहिली पाहिजे. नाहीं तर जगदेश्वरी पार्वतीमाईचें स्त्रीराज्य

जसें विलयाला गेलें, तशीच स्थिति या स्त्रीराज्याची झाल्याशिवाय राहाणार नाहीं.

रूप०—पार्वतीमाईचें स्त्रीराज्य कसें विलयाला गेलें?

सत्य०—बायांनो, तुह्मांला माहीतच आहे कीं, फार प्राचीन-काळीं हिमाचलाच्या ह्याच प्रदेशांत प्रमिलेप्रमाणेंच हिमकन्या पार्वती हिनें असलेंच स्त्रीराज्य स्थापिलें होतें.—प्रमिलेशीं लग्न लावण्याचा जसा अर्जुनानें आतां प्रयत्न चालविला आहे, त्याप्रमाणें पार्वतीशीं लग्न लावून पार्वतीमाईला परतंत्र करण्याचा देवांनीं व दैत्यांनीं कट केला.—प्रमिलेप्रमाणेंच स्त्रीस्वातंत्र्याचा कैवार घेण्याकरितां अवतरले-ल्या त्या आदिमायेला जेव्हां ह्या व्यूहाची बातमी लागली, तेव्हां त्या जगदीश्वरणीनें प्रचंड शक्ति निर्माण करून कटवाल्यांच्या म्होरक्यांचा-शुंभनिशुंभ राक्षसांचा—संहार केला.

वाग्म०—बरी, बरी, मेल्या पुरुषांची खोड मोडली!

बुद्धि०—सारे पुरुष मेले दैत्यच; त्यांचा संहारच केला पाहिजे.

वाग्म०—पूर्वीं म्हणे पुरुष तितके दैत्य आणि बायका तेवढ्या देव, असें होतें.

बुद्धि०—पांडवसेनेचा पराभव करून आम्हां बायकांचा दिग्विजय झाल्यावर सर्व देवळांतील देवांना आम्ही आतांही बाय-काच करूं.

सत्य०—दैत्यांचा दर्प जसा पार्वतीमाईनें नाहींसा केला, त्याप्र-माणें प्रमिले, तुझ्याही हातून या पांडवसेनेचा रणांगणांवर विध्वंस होईल, यांत संशय नाहीं.

रूप०—दैत्यांचा नाश झाल्यावर पार्वतीमाईचें स्त्रीराज्य कोणीं मोडलें?

सत्य०—ते आडदांड दैत्य पुरवले, पण गोड गोड बोलून फसविणारे हे पुरुषदेव नकोत. प्रमिले, रूपमाये, धनुष्यबाण सज्ज करून पांडवसेना जर या स्त्रीराज्यावर चालून आली असती, तर मला आनंदच झाला असता. पण शिष्टाईच्या नांवाखालीं गोड गोड बोलणाऱ्या ह्या तरुणांचें मला भय वाटतें.–पुरुषांचें मधुर व फसवी भाषण कानावर पडल्यानेंच पार्वतीमाईचें स्त्रीराज्य लयाला गेलें. देवांच्या शिष्टाईला बळी पडून, पिकलेल्या पानाप्रमाणें वृद्ध झालेले, आपल्या ज्ञानदृष्टीनें मदनाला जाळून टाकणार, विरक्त, विवेकी, असे म्हातारे स्त्रीराज्यांत आले तर स्त्रिया अधिक सज्ञान होतील, असें पार्वतीमाईला वाटलें; आणि तपस्वी म्हाताऱ्यांना स्त्रीराज्यांत वस्ती करण्याचा हक्क पार्वतीमाईनें दिला.- बायांनो, तेव्हां-पासून पार्वतीमाईच्या स्त्रीराज्याच्या शेवटास प्रारंभ झाला. पुढें सर्व सुखांना लाथाडून देणारा, स्वार्थत्यागी, लांब दाढीचा, म्हातारा जोगी, एक चिंधीची लंगोटी नेसून, सर्वांगाला भस्म चोपडून, पार्वतीमाईच्या राजधानीच्या स्मशानांत राहायला लागला; आणि मला सांगायला लाज वाटते, ह्याच मेल्या पुरुषाच्या पाया पडपडून त्याच्या पुढें नाचनाचून, रात्रंदिवस त्याचीं आर्जवें करून, बळेंच पार्वतीमाई त्याची बायको झाली !

मैत्रे०—जयशंकर ! जयशंकर !

प्रमि०—गुरुमहाराज, सेनापती, व इतर मंत्रिणी हो, आपण पार्वतीमाईच्या स्त्रीराज्याची हकीगत आतां ऐकलीच आहे. पण तुम्हां सर्व बायांच्या देखत व हस्तिनापूरच्या या वकिलांच्या समोर आम्ही अशी प्रतिज्ञा करितों कीं, एकादीही बाई आमचे हुकूम पाळायला तयार असेपर्यंत पार्वतीमाईप्रमाणेंच फसून लग्नाच्या जाळ्यांत सांपडून स्त्रीराज्याचें व त्याच्याबरोबर स्त्रियांच्या स्वातंत्र्या-

चें मातेंर आम्ही करणार नाहीं. गुरुमहाराज, आमची प्रतिज्ञा आम्हीं आतां जाहीर केली आहे, तथापि आपण सुचविल्याप्रमाणें शिष्टाईला आलेल्या या वकिलांच्या परीक्षा घेतल्याशिवाय आम्ही यांना स्त्रीराज्यांत दहा दिवस राहण्याची परवानगी देत नाहीं.-वकीलसाहेब, स्त्रीस्वातंत्र्याबद्दल व स्त्रीराज्याबद्दल तुमची खरोखर जर पूज्यबुद्धि असेल तर आम्ही सांगूं त्यांपैकीं एक तरी अट पाळायला तुम्ही तयार असलें पाहिजे.

**अर्जु०**—सरकारच्या सर्व अटी आम्ही सरकारचे हुकुमाप्रमाणें पाळूं.

**पुरो०**—स्त्रीराज्यांत असेपर्यंत स्त्रियांचे हुकूम पाळण्यांत पुरुषांना धन्यता वाटली पाहिजे.

**प्रमि०**—वकीलसाहेब, तुम्ही पुरुष आहां, तेव्हां तुम्हाला पुरुषाचेच न्याय आम्ही लागूं करतों.-तुम्हां पुरुषांत असा प्रघात आहे कीं वरिष्ठाची लपून छपून हांजी हांजी करावयाची असली म्हणजे त्यांची भाषा बोलण्यांत धन्यता मानूं लागायचें; व जिंकणारांना खुष करण्याकरितां त्यांच्या सारखा पोषाख करून त्यांच्या पुढें पुढें नाचायचें! आपल्या मनांतील पूज्यबुद्धि व्यक्त करून परक्याची पूजाअर्चा करण्याचा हा मार्ग तुम्हीं पुरुषांनीं सर्व जगाला दाखविला आहे! स्त्रीराज्यांत असतांना ह्या पौरुषी पद्धतींतली एकादी तरी गोष्ट तुम्ही करायला तयार आहां कां?

**रुद्र०**—काय मेले पुरुष अपमतलबी! यांनीं म्हणे "मी जातों" म्हणायचें—आणि आम्ही बायकांनीं 'मीं जातें' बोलायचें! भाषेंत देखील यांचेंच वर्चस्व! स्त्रीराज्यांत बायकीच भाषा सर्वांनीं वापरली पाहिजे.

ोषाखांत देखील मेल्या पुरुषांचा असाच वरचढपणा !
कांहीं तरी निराळें पाहिजे, ही यांच्या वर्चस्वाची
वकीलसाहेब, तुम्ही जर शालू नेसलात तर काय
बायकाप्रमाणें जर रेशमी जरीकांठी चोळी तुम्ही
, तर ती काय तुमच्या अंगाला खुपेल ?—आम्हां
ाख इतका सोइस्कर, तलम, मऊ, सुंदर, मोहक
आपलेपणाची एट मिरविण्याकरितां जाडीं भरडीं
ालून पौरुषी टेंभा आमच्यापुढें तुम्हांला मिरवा-
व्हे ?

ुगडींच या मेल्यांना नेसायला लावलीं पाहिजेत.

ापल्या चोळ्याच या मेल्यांच्या अंगांत घातल्या

वगत ] देवा, लुगडीचोळ्यांचा संस्कार म्हातारपणीं

यकी भाषा किंवा बायकी पोषाख, कोणची गोष्ट
ा ? एरव्ही तुम्हांला दहा दिवस राहण्याची परवा-
हीं.

दिवसांकरितां हे बायकी भाषा बोलतील. एका
ुसऱ्या दरबारीं गेला म्हणजे त्याला आपल्या
ुजर करावी लागते; तसें, वकील साहेब, मी
ोलायचें कबूल करितें ' असें म्हणा म्हणजे मग
ल म्हणून वावरायला हरकत नाहीं.

ी अळमटळम कां ? बायकी भाषेनें बोलला नाहीं
ीराज्याच्या बाहेर जावें लागेल.

**अर्जु०**—[ **पुष्पधन्व्यास** एकीकडे ] मग आतां कसें करावयाचें ?

**पुष्प०**—[ **अर्जुनास** एकीकडे ] चोळीलुगड्यापेक्षां भाषा बरी.

**रूप०**—विचार कसला चालविला आहे ? महाराणी साहेबांनीं सांगितलेली अट जर तुम्हाला पाळायची नसेल तर तसें स्पष्ट सांगा; रिकामें कुजबुजणें नको.

**अर्जु०**—[ **पुष्पधन्व्यास** एकीकडे ] मग करायचें कबूल ?

**पुष्प०**—[ **अर्जुनास** एकीकडे ] बायकांची हौस पुरुषांनींच भागविली पाहिजे.

**अर्जु०**—महाराणीसाहेब, बायकी भाषा बोलायचें मी कबूल करतें.

**मैत्रे०**—तुंग तूं दे आपली कबुली.

**पुष्प०**—मी देखील कबूल करतें.

**मैत्रे०**—ह्या दोघींच्या पोटांत आम्ही सगळयाजणी आलें पृथक कबुली देण्याचें कारण नाहीं.

**प्रमि०**—बायकी भाषा वापरण्याला तुम्ही सगळयाजणी कबूल झाला हें पाहून आम्ही फार खुष झालों आहोंत. या आनंदामुळें आजच्या सारख्या भर दरबारांत मात्र तुम्हीं बायकी भाषा वापरावी, इतर प्रसंगीं न वापरली तरी चालेल, अशी आम्हो तुम्हांला सवलत देत आहों. आज दरबारचें काम इतकेंच पुरें.

( पडदा. )

**अंक पहिला समाप्त.**

---

# अंक दुसरा.

## प्रवेश पहिला.

—०*०—

**स्थळ—रूपमायेच्या** महालापुढील रस्ता. **मैत्रेय** प्रवेश करतो.

**मैत्रे०**—स्त्रीयांच्या व पुरुषांच्या बलाबलाविषयीं वादविवाद करण्याकरितां रूपमायेच्या महालांत पुष्पधन्वामहाराज गेले आहेत; प्रमिलाराणीच्या मनांत प्रेम उत्पन्न करण्यांत अर्जुनमहाराज गुंतले आहेत; आणि राज्यकारभाराच्या गाड्याला नुसत्या बायका जुंपाव्यात का नुसते पुरुष जुंपावेत, ह्यांचें खलबत मुख्य प्रधान स्थिरमाया ह्यांच्याशीं मीं करावें, अशी मला अर्जुनमहाराजांची आज्ञा आहे. पण राज्यकारभाराचे गाड्यानें न लवंडता अलग अंतराळीं आम्हांस वाहून नेले म्हणजे मग गाड्याला एकादी म्हैस जुंपा किंवा एकादा रेडा जुंपा आमची तक्रार नाहीं, असल्या रिकामटेकडच्या बाण्याचा मी असल्यामुळें दुनियेचें निरीक्षण करीत मी रस्त्यांतून रिकामा हिंडतों आहे.–हा–हा कोण?–हा जागरूक! स्त्रीराज्यांत आल्यापासून हा थेरडाही माझ्यासारखा रिकामा झाला म्हणायचा!—पहा, पहा कसा हा म्हातारा रस्त्यांतल्या सगळ्या खिडक्यांकडे निरखून निरखून पाहत चालला आहे! [ जागरूक प्रवेश करतो ] जागरूका, बरा आलास, तुला मला एक प्रश्न विचारावयाचा आहे. मी इतक्या दिवस मनुष्य स्वभावाचा तलास करतों आहें, पण एक गूढ कांहीं मला उकलत नाहीं.

**जाग०**—तें कोणचें गूढ?

मैत्रे०--स्त्रीराज्याची स्थिति पाहिलीस. त्या पहा, कांहीं बायका गंध्याच्या दुकानांत बसल्या आहेत, कांहीं कापडाच्या दुकानांत लोळत पडल्या आहेत, कांहीं फुलाऱ्याच्या दुकानाच्या पायऱ्यावर रिकाम्या उभ्या आहेत, कांहीं माणसें पोथ्यापुस्तकाच्या दुकानांत बसून पुस्तकें पाहण्याचा बाहणा करून रस्त्यांतून येणाऱ्याजाणाऱ्या बायकांवर चोरटी दृष्टि फेकताहेत !-रोजच्या रोज हीं ऐदीं माणसें असा वेळ कसा काढतात ?

जाग०-- बेटच्या मैत्रेया, तूं स्वतः ऐदी झाल्याशिवाय त्यांतली लज्जत तुला समजायची नाहीं. जावें त्याच्या वंशा तेव्हां कळे. जी दृष्टीस पडेल त्या बाईचा चेहरा पहात स्वस्थ बसून वेळ गमावण्याची संवय ऐद्यांना कशी लागते, ह्याचा ह्या स्त्रीराज्यांत आज तीनचार दिवस मला चांगला अनुभव आला आहे.

मैत्रे०—ह्या स्त्रीराज्यांत माझा वेळच जाईनासा झाला आहे. ऐदी होण्याची चटक मलाही थोडीशी लावशील तर बरें होईल.—तुला कशी ही संवय लागली ?

जाग०—त्याचें असें झालें, अर्जुनमहाराजांनीं सत्यमाया गुरुमहाराज ह्यांच्या तैनातीला आम्हांला नेमलें.-माझें काम इतकेंच, एकसारख्या गोष्टी तिला विचारायच्या व ती म्हणेल त्याला हूं म्हणायचें. हांजी हांजी करण्याचा हा मुख्य प्रकार आहे.—'तुम्हां पुरुषांचें राज्य कधींही होणं शक्य नाहीं,' असें तिनें म्हटलें, कीं मी 'जी सरकार' म्हणायचें. 'राज्य करण्याची तुमची लायकीच नाहीं.'—'होय सरकार.'—'तुम्हाला जर अधिकार दिला तर तुम्ही आपआपसांत भांडून एकमेकांच्या उरावर बसून सर्व देशाचा चुथडा कराल.'—'खरें आहे सरकार.'—'आमचें राज्य निरंतर तुमच्यावर असलें पाहिजे.'—'कबूल ससकार.'—अशा रीतीनें

हांजी हांजी करून त्या गुरुजींच्या मनांत अर्जुनमहाराजांच्या संबंधानें संशय उत्पन्न होऊं द्यायचा नाहीं, हें काम माझ्याकडे आहे. त्यामुळें ती बाई बडबड करीत असतांना पुराण ऐकत बसल्याप्रमाणें ऐद्यासारखें तोंड वासून राहण्याची मला ह्या दोन तीन दिवसांत चांगली संवय लागली.

**मैत्रे॰**—पुराण ऐकणाऱ्या बायांप्रमाणें वाती करण्याचें काम तुला सांगितलें असतें तर तुझा ऐदीपणा कमी झाला असता. रस्त्यांतून जाणाऱ्या येणाऱ्या बायकांना पाहण्याकरितां दुकानांतून बसणाऱ्या ऐद्यांकडून दुकानाचें भाडें म्हणून दुकानदारानें वाती तरी करून घ्याव्यात, असा स्त्रीराज्यांत हुकूम जारी करण्याविषयीं प्रमिलाराणीला मी विनंति करणार आहें.

**जाग॰**—अरे बापरे ह्या लष्करी बाया आल्या !

[ **जागरूक** तोंड चुकवून उभा राहतो. **बुद्धिमती** व **वाग्मती** येतात. ]

**मैत्रे॰**—( स्वगत ) स्त्रीराज्यांतल्या लष्करांत इतक्या सुंदर व तरुण बायकांचा भरणा कसा झाला, ह्याचें मला आश्चर्य वाटतें !

**वाग्म॰**—कायरे थेरड्या, रस्त्यांत काय करतो आहेस ?

**बुद्धि॰**—ह्या मेल्या पुरुषांना रस्त्यांतून हिंडण्याची संवय !

**वाग्म॰**—कधीं माजघरांत बसून राहिले आहेत ! व्हायचेंच नाहीं !

**बुद्धि॰**—मेल्यांच्या पायावर नक्षत्र पडलें आहे जसें ! घरीं किती चांगलें असलें तरी ह्यांना गोड वाटायचेंच नाहीं.

**वाग्म॰**—बाहेर जाऊन दहा ठिकिरडे फुंकून येतील तेव्हां या मेल्यांचा जीव थंड व्हायचा !

**वाग्म॰**—पुरुषांची जातच घरांतली नव्हे !

**बुद्धि॰**—ह्यांचा पिंडच बाहेरचा !

**मैत्रे०**—मग काय, आह्माला घरांत कोंडून ठेवायचा बेत आहे ?

**बुद्धि०**—हो! हो! कोंडून ठेवणार. सत्यमाया गुरुमहाराजांचा शिष्य झालेला थेरडा कोणता? त्या मेल्याला कोंडून ठेवला पाहिजे.

**मैत्रे०**—तो मी नव्हे.

**वाग्म०**—तूं तो ऐस किंवा दुसरा कोणीहि ऐस आह्माला काय करायचें आहे? कोंडून ठेवायला आह्माला एक थेरडा मिळाला म्हणजे बस झालें.

**मैत्रे०**—अपराध कांहीं नसतांना ?

**बुद्धि०**—अपराध ह्मणजे लहानसहान का? गुरुमहाराजांनीं त्या थेरड्याला सांगितलें ऋग्वेदांत देखील बायकांचेंच वर्चस्व आहे.—तो थेरडा होय म्हणाला, आणि त्याची पक्की खात्री करण्याकरितां ऋग्वेदाची पोथी गुरुमहाराज शोधीत होत्या. इतक्यांत त्या मेल्यानें तोंड काळें केलें!—उडाणटप्पू मेले हे पुरुष !

**मैत्रे०**—तुमच्यांपैकीं कोणीतरी बाईनें डोळ्याची खूण करून त्याला तेथून बाहेर काढला असेल !

**जाग०**—आतां गुरुमहाराजांनीं ऋग्वेदांतल्या साऱ्या अप्रसिद्ध बायका प्रसिद्ध केल्या आहेत, आणि त्या बायकांची यादी गुरुमहाराज त्या थेरड्याला वाचून समजावून सांगणार असल्यामुळें त्या चुकारतट्टूला पकडून आणण्याचा आम्हांला हुकूम झाला आहे.

**मैत्रे०**—ह्या स्वतंत्र बायका केव्हां कोणच्या म्हाताऱ्याला घरांतून उठवतील कांहीं नेम नाहीं !

**बुद्धि०**—गुरुमहाराज म्हणाले, हे मेले पुरुष कोणत्या तरी रस्त्यांत भटकत असतील.

**वाग्म०**—हा चौक आम्हीं सर्व धुंडाळला, मेल्यानें कोठें तोंड चुकविलें आहे!

**बुद्धि०**—आतां तो सांपडत नाहीं तर ह्याच ह्मातान्याला नेऊं या. [ दोघी दोन हाताला धरतात. ]

**मैत्रे०**—मला पूर्वींच्या, आतांच्या, पुढच्या सगळ्या बायकांचें वर्चस्व कबूल आहे.—मला सोडून द्या.—ऋग्वेदांतल्या बायकांहून तुह्मीच अधिक हुषार आणि कर्त्या आहां.—आतां द्या मला सोडून.

**बुद्धि०**—( **जागरूकाला** पाहून ) हा कोण?

**मैत्रे०**—हं, गुरुमहाराजांची शाळा चुकविणारा हाच तो थेरडा. ह्याला पकडा, मला सोडा.

**बुद्धि०** व **वाग्म०**—हाच तो, हाच तो.

[ दोघी **जागरूकाला** पकडतात. ]

**मैत्रे०**—आतां चांगला कोलदांडा घालून सत्यमायेच्या शाळेंत याला घेऊन चला.—म्हातारपण म्हणजे दुसरें बाळपण आहे.—दोन घटका ह्याला घुडीवर चढवा, आणि सत्यमाया गुरुमहाराजांना म्हणावें अंगठे धरून ह्या म्हाताऱ्याला उभा करा. नाहींतर ऋग्वेदांतल्या सगळ्या बायकांच्या नांवांची संथा द्या.

**जाग०**—मी आलों.—मला धरायला नको.—मी न येणारा नव्हे. ह्या मैत्रेयाला एक निरोप सांगायचा आहे.—आतां बरा आढळला आहे.—सांगतों आणि हा आलोंच. [ त्याला सोडतात. ]

**वाग्म०**—लवकर ये निरोप सांगून.

**बुद्धि०**—आम्ही बदली बिदली साफ ऐकणार नाहीं.

[ **मैत्रेय** व **जागरूक** कुजबुजतात.]

**वाग्म०**—गडे बुद्धिमती, गुरुमहाराजांकडे जातांना हा बुड्ढा करीत असलेली अळमटळम पाहून माझ्या भावाची मला आठवण

होते.-असाग बाई शाळेंत जातांना हट्ट करीत असे, अशी त्यानें पाटी फेंकून द्यावी, लेखणी सांपडतच नाहीं म्हणून सबब सांगावी ! कायग बाई शाळा चुकविण्याकरितां त्यानें रोजरोज नवी नवी युक्ति काढावी ! आतां शाळेंत निमूटपणें जात असेल नाहीं ?-ह्या स्त्रीराज्यांत अडकून पडल्यापासून मला त्याची वार्ता देखील समजत नाहीं.

**बुद्धि॰**—गडे वाग्मती, माझा मुलगा देखील एव्हांना करता सवरता झाला असेल-त्याची मला आठवण झाली म्हणजे ह्या स्त्रीराज्यांत मी कोठून नोकरीला राहिलें असें मला होऊन जातें. देवा, तारुण्याच्या सर्व मंगलदायक सद्गुणांनीं सुशोभित झालेला माझा मुलगा माझ्या दृष्टीस कधींच पडायचा नाहीं का ?

**वाग्म॰**—मी म्हणतें नवऱ्यांना स्त्रीराज्यांत नये येऊं देऊं. पण मुलग्यांना किंवा भावांना आणायला कायग हरकत आहे बुद्धिमती?

**बुद्धि॰**—हरकत कसली, मीं महाराणीसाहेबांना एकदां विनंति देखील केली होती.

**वाग्म॰**—मग त्या काय म्हणाल्या ?

**बुद्धि॰**—त्या म्हणाल्या एकीचा मुलगा दुसरीचा नवरा होऊं शकतो.-मीं किती सांगितलें कीं माझा मुलगा तशांतला नाहीं हो; पण त्यांनीं कांहीं बाई परवानगीच दिली नाहीं.

**वाग्म॰**—ए म्हाताऱ्या, सांगितलास का निरोप ?

**बुद्धि॰**—आटप लवकर.

[ **वाग्मती** व **बुद्धिमती** आपआपसांत कुजबुजतात. ]

**जाग॰**—मैत्रेया, माझ्यावर एवढे उपकार कर. अर्जुनमहाराज भटले म्हणजे त्यांना काकुळतीनें विनंति कर, म्हणावें प्रमिला-

राणीला लवकर वश करून घ्या, आणि मला ह्या बाईच्या जागरूक-नांच्या तडाक्यांतून सोडवा. जातों मी–चला बायांनो, मला सत्य-मायेच्या मंदिराकडे घेऊन चला हं.

[ **बुद्धिमती, वाग्मती, जागरूक** जातात. ]

**मैत्रे०**—दहा घरचे दहा तुकडे झोळींत गोळा करणाऱ्या मधु-कऱ्याप्रमाणें रस्त्यांत फिरून, एकीचा डोळाच ध्यानांत ठेव, दुस-रीचा गालच पहा, तिसरीच्या नाकावरच दृष्टी फेंक, असे निरनि-राळ्या ठिकाणचे निरनिराळे तुकडे खिशांत जमवून, कल्पनेच्या जोरावर ह्या खिचडीची नवीन सर्वांगसुंदर मूर्ति तयार करणाऱ्या कवीचा उद्योग माझ्यामागें लागला असल्यामुळें मी रस्ता सोडून महालांत जावयाचा नाहीं; आणि अर्जुनमहाराजांना महालांत बसून राहणारी प्रमिला वश करून घ्यावयाची असल्यामुळें ते महाल सोडून कांहीं बाहेर पडावयाचे नाहींत. तेव्हां अर्जुनमहाराज मला कसचे भेटणार व त्यांना जागरुकाचा निरोप मी कसचा सांगणार? –जेव्हां मधुकऱ्याची व श्रीमंताची गांठ दैवयोगानें पडेल तेव्हां जागरुकाचा निरोप कानावर घालूं. [ जातो. ]

---

## प्रवेश दुसरा.

—०*०—

स्थळ–प्रमिलाराणीचा महाल.

( **प्रमिला, रूपमाया, अर्जुन, पुष्पधन्वा** बसले आहेत. )

**अर्जु०**—महाराणीसाहेब, गुरुमहाराज सत्यमाया ह्यांच्या सल्या-प्रमाणें वागून स्त्रीराज्याची स्त्रीसेना जर पांडवांच्या सैन्याशीं लढा-यला सज्ज झाली, तर त्याचा परिणाम स्त्रीराज्याला अत्यंत घातुक

झाल्यावांचून राहणार नाहीं. मी हें कबूल करतों, कीं आपल्या सारख्या वीरकन्यांना शस्त्रास्त्रांची माहिती असणें जरूर आहे. प्रसंगविशेषीं त्या शस्त्रास्त्रांचा उपयोग संकटीं पडलेल्या स्त्रियांनीं केला असतां त्याबद्दल स्त्रीवर्गाची कीर्तिच होणार आहे. पण परशत्रूपासून मानवीसमाजाचें संरक्षण करण्याचा बोजा अर्जुनमहाराजांच्या खांद्यावरून महाराणीसाहेबांनीं आपल्या अंगावर घेणें, किंवा शांततेच्या प्रसंगीं कज्जेदलालीच्या तंटेबखेड्यामध्यें रूपमाया सेनापतीसाहेबांनीं वादीप्रतिवादीचें काम आपल्याकडे घेणें म्हणजे परमेश्वरी संकेताविरुद्ध वागण्यासारखें आहे. मातेचा मान परमेश्वरानें बायकांकडे ठेवून तंटेबखेड्याच्या यातायातींतून सरकारद्वयाला मुक्त केलें आहे.

रूप०—रणांगणावर लढायचें काम अर्जुनमहाराजाकडे, आणि लोभी किंवा क्रोधी शेजाऱ्यापाजाऱ्यांशीं भांडण्याचेंही काम पुष्पधन्वा-महाराजांकडे, अशा व्यवस्थेला कबुली दिल्यावर प्रमिला महाराणी-साहेबांनीं व मी दळणकांडण करून खरकटीं भांडीं घासून आयुष्याचे दिवस कंठावेत, असेंच तुमचें म्हणणें आहेना? महत्त्वाचीं व जबाबदारीचीं कामें करण्याचा आव घालून वर्चस्व, संपत्ति, व अधिकार आपल्याकडे ओढण्याचा मेल्या पुरुषांचा—ह्या पांडवांचा—हा कावा आहे.—कधींकाळीं शेजाऱ्यांशीं भांडायचें, सणावारीं लढायचें, आणि ह्या कामगिरीबद्दल रोजच्यारोज, रात्रंदिवस, प्रत्येक प्रहराला, प्रत्येक घटकेला, प्रत्येक निमिषाला, आपल्या लहरी-प्रमाणें प्रमिलाराणीसाहेबांना वागवायला पहायचें! असल्या दुष्ट बुद्धीनेंच तो मेला अर्जुन महाराणीसाहेबांशीं लग्न करूं पाहतो आहे.

प्रमि०—ही दुष्टबुद्धि जगांतून नाहींशी करण्याकरितां आम्हीं स्त्रीराज्य स्थापिलें आहे. जीं जीं कामें करून पुरुषांनीं आपली

बडेजावी जगांत चोहोंकडे वाढविली आहे, तीं सर्व कामें आम्ही बायका करूं शकतों हें पुरुषांच्या अनुभवाला आणण्याकरितां व त्यांच्या शेखीचे दिवस आतां उरले नाहींत हें पुरुषांना समजूं लागावें म्हणून आमचे हे प्रयत्न चालले आहेत. आमचे गुरुमहाराज सत्यमाया ह्यांच्या इतकी अगाध विद्वत्ता, सूक्ष्म तत्त्वज्ञान, प्रगल्भ धर्मदृष्टि, आणि प्रचंड स्वार्थत्याग करून अत्यंत मेहनतीनें व उग्र तपश्चर्येनें कमावलेला योगाभ्यास, ह्यांपैकीं एक तरी सद्गुण तुमच्या पांडवांत आहे काय? आमचे सेनापति रूपमाया, स्त्रीसेना व स्त्रीसामर्थ्य हीं एकदम प्रगट करणारी त्यांची गहेरी नजर, स्त्रीसेनेचीं हत्यारें वापरण्याची त्यांची चपलता, परशत्रूला घायाळ करून मेटाकुटीस आणणारे त्यांचे डावपेच, ह्यांपैकीं कोणची शक्ति तुमच्या सेनेचे अधिपति पुष्पधन्वा ह्यांच्यापाशीं आहे?

रूप०—शिवाय स्त्रियांची विद्वत्ता, स्त्रियांचें तत्त्वज्ञान, स्त्रियांचें राजकाजपटुत्व, स्त्रियांची परोपकारबुद्धि, स्त्रियांचें सेनानायकत्व, इत्यादि सद्गुणांचा पूर्ण विकास होऊन पुरुषांना आश्चर्यचकित करून सोडण्याकरितां ज्या आमच्या महाराणीसाहेबांनीं स्त्रीराज्याच्या कल्पनेचा अपूर्व शोध केला, व नंतर त्या कल्पनेप्रमाणें स्त्रीराज्य स्थापून जगाला चकित करून हस्तिनापूरच्या तुम्हां पुरुषकोकिलांनाही भरदरबारांत स्त्रियांच्या रीतिरिवाजांचें व भाषेचें अनुकरण करायला भाग पडलें, त्या ह्या प्रमिलामहाराणीसाहेबांच्या अतर्क्य सामर्थ्याचा एकलक्षांश भाग तरी तुमच्या त्या अर्जुनाच्या अंगीं आहे काय?

पुष्प०—अर्जुनमहाराजांचें सामर्थ्य काय आहे हें त्रिभुवनाला रणांगणावर माहीत झालें आहे. तेव्हां त्यासंबंधानें येथें वर्णन करीत बसण्याची कांहीं जरूरी नाहीं. आतां चार बायका एका

ठिकाणीं गोळा केल्याबद्दल पाहिजे तर आम्ही प्रमिलामहाराणी-साहेबांची तारीफ करतों; पण हें असलें काम हळदीकुंकवासारख्या प्रसंगीं आमच्या पुरुषराज्यांतल्या पोरीबाळी देखील करीत असतात.

अर्जु०—महाराणीसाहेब, पुरुषराज्यांतल्या बायकांची थोरवी मी आतां आपल्यापुढें मांडतों, त्याबद्दल माफी असावी. संसारांत पुरुषांचें वर्चस्व असावें, का बायकांचें वर्चस्व असावें, अशा खोट्या भ्रमाचा प्रश्न पुरुषराज्यांतल्या चंचलवृत्तीच्या थोड्याशा बायांशिवाय इतरांना उपस्थितच होत नाहीं. स्वतंत्र स्त्रीराज्य स्थापून अधिकार आणखी सत्ता आपण बायकांवरच गाजवीत आहाना? आमच्या पुरुषराज्यांत अशा लाखो स्त्रिया पडल्या आहेत, कीं ज्या पुरुषांवर प्रत्यक्ष अधिकार मिरवीत आहेत. महाराणीसाहेब, आमच्या पुरुषराज्यांतल्या सर्व पुरुषांना लहानपणीं सर्वतोपरी कोणच्या ना कोणच्या तरी बाईवरच अवलंबून राहवें लागतें!—अशा दुर्बळपणाच्या, अनन्यगतिकत्वाच्या, व आनंदानें कबूल केलेल्या परजातीच्या पारतंत्र्यांत पुरुषजातिशिवाय अखिल विश्वांत दुसऱ्या कोणत्याही जातीला आपल्या जन्माच्या आरंभींचा सर्व भाग कंठावा लागत नाहीं.

**रूप०**—बायका देखील जन्मल्यापासून बरींच वर्षे पुरुषांप्रमाणें आपल्या आईच्याच कबजांत असतात हो!

**पुष्प०**—हो, पण बायकांच्या आया झाल्या तरी बायकाच असतात. पुरुष कांहीं बायकांच्या आया नव्हेत. आयांच्या साम्राज्यसत्तेच्या मानाला पुरुषजात कायमची मुकली आहे.

**अर्जु०**—महाराणीसाहेब, आपण रूपमाया सेनापतींवर, किंवा रुद्रमाया कोतवालसाहेबांनीं बुद्धिमती, वाग्मती, अशा स्त्रीसैनि-

कांवर सत्ता मिरवली तर त्यांत काय आहे ? ह्या सगळ्या बायकां-वरचना आपण राज्य चालवीत आहां ? अर्जुनमहाराजांना जर आपण मुठींत ठेविलें तर मात्र आपली शहामत खरी !

प्रमि०—रणांगणावर अर्जुन आमच्या सामोरा आला तर त्याला जिंकून जिवंत पकडून त्याचे कान उपटल्याशिवाय आम्ही राहणार नाहीं.

पुष्प०—अर्जुनमहाराजांना जिंकून त्यांचे कान उपटण्याची सरकारची महत्त्वाकांक्षा अर्जुनमहाराजांशीं लग्न केल्याशिवाय कधींच सफल व्हावयाची नाहीं. पुत्राच्या रूपानें नवराच पुन्हा जेव्हां बायकांच्या पोटीं जन्मास येतो, तेव्हांच काय तो नवऱ्यानें मिरवलेल्या वर्चस्वाबद्दलचा सूड पुत्राचे कान उपटून बायकांना उगवायला मिळतो !

( बुद्धिमती, वाग्मती, एक भिल्ल व एक भिल्लीण असे येतात. )

बुद्धि०—सरकार, कसूर माफ. ह्या मेल्या धटिंगण तरुण पुरुषानें बिनपरवान्यानें स्त्रीराज्यांत प्रवेश केल्याबद्दल त्याचा कडेलोट करण्यापूर्वी सरकारची परवानगी पाहिजे, म्हणून ह्याला सरकारापुढें आणलें आहे.

प्रमि०—तूं कोण आहेसरे ?

भिल्ल०—सरकाराला भिल्लाची वळख पटली न्हाई जणूं.—गरीबाची याद सरीमंताला कशापाई राहती हाय ?

रूप०—लवकर बोल, तूं हा अपराध कां केलास ? तुझ्यासारख्या तरुण पुरुषाचें तोंड देखील आम्ही स्त्रीराज्यांतल्या बायका पहात नसतों; माहीत नाहीं तुला ?

भिल्ल०—त्वांड दावाया मी कवा आलोया ? ह्या दोघी आवांनी धरूनश्यानी आणलं नव्ह का ? लई दिसाची गोष्ट न्हाई सरकार,

ह्या दोघी बया श्वेतकेतुमहाराजांच्या शिकारखान्यामंदिं वाघवाघी-नींच्या पिंजऱ्याची झाडलोट कराया माझ्या हाताखालीं व्हत्या.—आतां जनूं सरकारच्या ध्येनांत आलं.—श्येतकेतुमहाराजांच्या शिकारखान्यांतल्या वाघावरचा ह्यो—

रूप०—तें आम्ही कांहीं ऐकणार नाहीं.—तुझा कडेलोट—

भिल्ली०—ए बया, माझा अदुगर कडेलोट कर, मग घर-धन्याक्षी पकडून श्येनी न्ये.

रूप०—अग तूं अशी वेडयासारखी काय बरळतेस ? तुझा नवरा ह्मणून मिरविणाऱ्या ह्या मेल्या पुरुषाचा कडेलोट करण्यांत आला, तर त्यांत तुझें काय नुकसान आहे ? हें पहा तुला आम्ही आमच्या लष्करांत मोठ्या हुद्याची जागा देऊं.

भिल्ली०—नग, नग, तुझा हुद्दाबिद्दा मला कायबी नग. माझा पत्पाति दादला मला होवा.

रूप०—काय मेली अडाणी जात आहे तरी ! स्त्रियांच्या लष्क-रांत हुद्याची जागा पत्करून सर्व स्त्रीजातीचें कल्याण करण्याची संधि आली असतांना पुरुषांच्या नादीं लागून स्त्रियांचें बदनाम करायला ही मेली तयार ! असल्या बायका स्त्रीजातींत अद्याप आहेत, म्हणून या मेल्या पुरुषांची एवढी प्रतिष्ठा चालली आहे.

भिल्ली०—आपून रूपमाया सेनापतीन न्व्हं ? आपल्या पायीं माझ्या घरधन्याक्षी मरन येनार.

रूप०—माझ्या पायीं काग म्हणून सटवे ? तुझा नवरा पुरु-षाच्या जन्माला आला, आणि स्त्रीराज्यांत बिनपरवानगीनें शिरून बायकांची बेअब्रू त्यानें केली, त्याचें प्रायश्चित्त तो भो-गतो आहे.

**प्रमि०**—गडे रूपमाये, तूं या मिलमिलीणीला ओळखलें नाहींस का ? अग, बाबांच्या शिकारखान्यावरचा हा 'पशुपति' नव्हे का ? त्याची बायको ही करालमाया. तुला आठवत नाहीं ? लहानपणीं तूं वाघाच्या पिंजऱ्यांत हात घातला होतास, आणखी वाघानें लडिवाळपणानें तुझा हात दाढेंत दाबून धरला होता,–

**बुद्धि०**—आणि त्यावेळीं रूपमायाबाईसाहेब बिलकुल घाबरल्या नाहींत. उलट वाघाकडे पाहत हांसत तशाच उभ्या राहिल्या.– सरकारांनीं त्या वेळीं पिंजऱ्यांत हात घालून वाघाच्या मिशा उपटून रूपमाया बाईसाहेबांचा हात सोडविण्याचा प्रयत्न केला, नव्हे सरकार ?

**प्रमि०**—आणि तेव्हां माझाही हात त्या मेल्या वाघानें आपल्या दोन पंजांमध्यें दाबून धरला. मग बाबा घाबरून गेले, आईही घाबरून गेली, काय करावें हें कोणाला सुचेचना !

**रूप०**—पण आपण दोघीजणी हांसत खेळत गम्मत करीत जशाच्या तशा उभ्या होतों गडे !

**अर्जु०**—पुढें ज्यांनीं स्त्रीराज्य स्थापिलें त्यांची लहानपणची अशी लीला असणें अगदीं स्वाभाविक आहे.

**प्रमि०**—गडे रूममाये, हीच करालमाया त्यावेळीं धिटाईनें पिंजऱ्यांत शिरली आणि वाघाच्या दाढेंतून आणि पंजांतून तुझा व माझा हात हिनेंच सोडविला. बाबांनीं तुझें व माझें कसें कौतुक केलें, आईनें तुला आणि मला पोटाशीं कवटाळून धरलें असतांना तिच्या डोळ्यांतून निघणारे आनंदाश्रू आपल्या गालावर कसे पडले; मला सर्व सर्व आठवूं लागलें आहे !

**रूप०**—त्या वेळीं लाजून पदराच्या आड तोंड लपविणाऱ्या आम्हां दोघीजणींचे चेहेरे हनवटीला धरून वर करून थोरल्या

बाईसाहेब महाराजांकडे पाहत हंसत ह्मणाल्या, दिग्विजय करून पृथ्वीला पादाक्रांत करणारे वीर या धीट पोरीच्या पोटीं खात्रीनें जन्माला येतील.

**प्रमि०**—तुझा मुलगा अगोदर दिग्विजय करील का माझा मुलगा अगोदर दिग्विजय करील, ह्मणून आह्मी दोघीजणी एक-मेकींशी थोडा वेळ भांडलों, नाहीं? आपल्या त्या भांडणाची आठवण आईला मरेपर्यंत होत असे.—आईबापांनीं कौतुक करण्याचे ते आमचे लहानपणचे दिवस निघून गेले!

**रूप०**—खरेंच महाराणीसाहेब, असें होईल तसें होईल ह्मणून लहानपणीं जी आपल्याला गोड स्वप्नें पडत असतात, त्यांतलें कांहींच पुढें थोरपणीं घडून येत नाहीं.

**बुद्धि०**—घडून न यायला काय झालें? पांडवांच्या सैन्याशीं युद्ध न करतां अर्जुनाशीं व पुष्पधन्व्याशीं जर सरकारद्वयांनीं लग्न लावलें तर अजून सरकारच्या पोटीं वीर पुरुष निपजून थोर-ल्या बाईसाहेबांचें भाकीत खरें होईल.

**प्रमि०**—गप्प बैस, चोमडी कोठली! तुला कोणीं मध्यें बोला-यला सांगितलें?

**अर्जु०**—सरकार, तिचें म्हणणें कांहीं खोटें नाहीं.

**पुष्प०**—सरकारच्या पुण्यश्लोक मातुःश्रींचे शब्द खरे करून दाखवायाचा बोजा सरकारद्वयाच्या माथीं आहे.

**प्रमि०**—करालमाये, तुझ्या नवऱ्यानें स्त्रीराज्यांत शिरण्याचें कां साहस केलें सांग पाहूं?

**करा०**—काय सांगूं सरकार, सबुदबी न्हाई उमटत. रूपमाया महाराणीसाहेबांच्या आईसावांनीं मला हाटकलं, आन् काय म्हन-तात ' करालमाये, करालमाये, ह्यो कागद रूपमाया रानीच्या हाता-

6716

मंदी व्येगी व्येगी नेऊनश्यानी टाक.' म्यां म्हटलं 'लईब्येस.' आन तशीच पल्याडल्या पहाडावरूनश्यानी चेंडू फेकल्यावानी टन-टन उड्या मारीत खालीं वरगळूं लागल्ये नव्ह का ?

रूप०—करालमाये, दे तें आईचें पत्र लवकर दे मला.

करा०—आईसाबांनीं सांगितलं हाय ह्यो कागुद म्हनूनश्यानी परिमला महारानीसाबांना ठाव झालं तर तुझी जीभच कापुनश्यानी टाकीन.—परान ग्येला तरी हाथ कागुद न्हाई देनार.

प्रमि०—गडे रूपमाये, ह्या वेडीच्या नादीं लागून उपयोगीं नाहीं. करालमाये, जराशानें आमच्या सेनापतीसाहेबांच्या महालांत जाऊन तूं तें पत्र दे. बरें पशुपती, स्त्रीराज्यांत शिरण्याचा अपराध तूं कां केलास तें सांग. करालमायेनें पूर्वीं एकदां आमच्यावर उपकार केले होते, एवढ्यावरून कडेलोटाच्या शिक्षेतून तूं वांचशील असें मनांत देखील आणूं नकोस.

भिल्ल०—कान धरुनश्यानी ख्येचून आनल्यावानी ह्या बायकी तरासांत आलो नव्हका ?—असं झालं या—कैलसावानी उच पहाडाच्या डोक्यावर पुरुस बसत्याती व्हयंना ? थतच मी व्हतो.—तळाला, लई खोल लई खोल तळाला बायकी राज्य व्हत.—आन जवाक फटाकडी करालमाया चेंडवावानी एका पहाडावरून दुसऱ्या पहाडावर उड्या मारू लागली तवा ही मरूनश्यानी हिच्या हाडाचा चूरबी गवसनार नाहीं असं वाटूनश्यान म्या लई रड रड रडलो. मरनाच्या अगुदर हिला सावरूनश्यानी धरावी म्हणून म्याबी पहाडावरन उडी घेतली; आन् बिजलीचा लोट आभाळाच्या निळ्या मुंडाश्यांतून निघून जमिनीवर आदळावा तसा मीबी पुरुसराज्यांतून इस्तरी राज्यावर एकदम हापटलो. आन् इस्तरी रा-

ज्याला पाय लागून हिच्या हाडकाच पीठ व्हनार तोच लोन्याच्या गोळ्यावानी हिला हातावर ऐकदम झेलून धरली ह्या मर्दान !

**बुद्धि०**—पहाडावरून खालीं उतरलास हें ठीक झालें, पण सरस्वतीनदीच्या अलीकडे आमच्या हद्दींत यावयाला कोणीं सांगितलें ?

**भिल्ल०**—सरसती नदीच्या पल्याडल्या जंगलाच वाघरू हिला खाऊनश्यानी टाकत्याल म्हनुनश्यानी एकदोन इसा वाघासनी मारूनश्यानी सरसतीच्या आल्याड आलो, तवा ह्या आवानी मुसक्या बांधल्या नवका ?

**भिल्ली०**—सरकार, सरसती नदीच्या पल्याडचे संमद वाघ कोनबी बया गेली तिला खाऊन टाकतात न्हका ? जंगलामंदी संमद वाघ सींह हायती, आन त्ये संमद इस्तरीराज्यामधील बायास्नी भीतबी न्हाईत. इस्तरीराज्यामंदी बापय कोनबी न्हाइ, तवा घरधन्यासनी संग आनलया.

**प्रमि०**—बुद्धिमती, ह्या भिल्लाला आणि भिल्लीणीला कोतवालाच्या पाहाऱ्यांत नेऊन ठेव. सेनापतीचा हुकूम होईल त्याप्रमाणें ह्या करालमायेला त्यांना नेऊन भेटीव.—गडे रूपमाये, तुझ्या आईनें पत्रांत काय लिहिलें आहे तें समजल्यानंतर ह्या पशुपतीच्या उन्मत्त वर्तनाबद्दल त्याला काय शासन करायचें तें ठरवूं.

**भिल्ल०**—सरकार, इस्तरीराज्याच्या कड्यावरून पुरुसराज्यांत लोटून देण्याची मला शिक्षा करावी. पन माझ्या करालमायेला हाथ हुद्दाविद्दा देऊनश्यानी ठेवूं नका.

**भिल्ली०**—दादलाबायकोची ताटातूट करणाऱ्या आवांना चार ईसा आणि योक जनम रंडकी हावें लागतया सरकार.

[ बुद्धिमती, भिल्ल, भिल्लीण, जातात. ]

प्रमि०—अडाणी जात मेली! आमच्या स्त्रीराज्याला मोठें भय काय तें असल्या अडाणी बायकांचें.

अर्जु०—सरकार, मला वाटतें पांडवाच्या सैन्यानें जर हें स्त्रीराज्य लवकर मोडलें नाहीं, तर सरस्वती नदीच्या पलीकडल्या जंगलांत संचार करणाऱ्या नरपशूंच्या तावडींत स्त्रीराज्यांतल्या बायका सांपडल्यावांचून कांहीं राहणार नाहींत.

पुष्प०—सरकारांनीं जर अर्जुनमहाराजांशीं विवाह करण्याचें नाकारलें, आणि बायकांच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करून पांडवांचें सैन्य हें स्त्रीराज्य न मोडतां जर पुढें गेलें, तर आसपासचे सर्व क्रूर नराधम बायाबापड्यांच्या ह्या राज्याभोंवतीं घिरट्या घालून त्यांचा नाश केल्यावांचून राहणार नाहींत. सज्जनांशीं मिळून मिसळून राहून स्त्रियांचा लौकिक वाढवायचा का दुर्जनांच्या तावडींत सांपडून आपला अधःपात करून घ्यायचा, हा सरकारापुढें सांप्रत मोठा प्रश्न आहे.

अर्जु०—रणांगणावर पुरुषांशीं लढण्याची ताकद बायकांच्या अंगीं नाहीं, इतकेंच नव्हे तर जंगलांत शिकार करून हिंस्र पशूंना भिवविण्याचीही शक्ति महाराणीसाहेबांच्या स्त्रीसेनेंत नाहीं. ही शक्ति जर असती तर भिल्लाला सोबतीला आणण्याचा प्रसंग करालमायेवर आलाच नसता.

प्रमि०—वकीलसाहेब, ह्या सर्व गोष्टींचा विचार करूनच आम्हीं स्त्रीराज्याची स्थापना केली आहे. बायकांना लढतां यावयाचें नाहीं, व शिकार साधावयाची नाहीं, ही कल्पनाच वेडगळपणाची आहे. आम्ही पांडवांच्या सैन्यालाही भीत नाहीं, आणि सरस्वती नदीपलीकडल्या हिंस्र पशूंनाही भीक घालीत नाहीं. असल्या धमकावणीनें भेदरून जाण्याइतक्या स्त्रीराज्यांतल्या बायका अबला नाहींत, हें पक्कें ध्यानांत ठेवा—शिकार करण्याला

आम्ही बायका नालायक काय ?-सेनापती, सर्व स्त्रीसैन्याला आज्ञा फर्मावा, कीं आमचा तळ आणखी तीन दिवसांनीं सरस्वती नदीपलीकडल्या जंगलांत पडेल. वकीलसाहेब, तुम्हीही त्या वेळीं आमच्या तळांत हजर रहा; आणि सरस्वती नदीपलीकडल्या सर्व हिंस्र पशूंची शिकार करून क्रूर वाघांचा संहार आम्ही बायका कसा करतों हें पाहून स्त्रीराज्याच्या सामर्थ्याचें वर्णन पांडवांपाशीं करा. आमच्या अपूर्व शौर्याचें तें वर्णन तुमच्या तोंडून ऐकल्यावर तो मेला अर्जुन आमच्यापाशीं युद्ध करायलाच तयार होणार नाहीं; आणि नंतरही यदाकदाचित् तो मेला तयार झाला तर हिंस्र पशू माझ्या शिकारींत जसे मारले जातात, तसेच पांडवही माझ्या बाणांना बळी पडतील, हें पक्कें समजा.-रूपमाये चल, गुरुमहाराजांचें दर्शन घेऊन आपला हा शिकारीचा बेत त्यांना कळवूं. [ जातात. ]

---

# प्रवेश तिसरा.

स्थळ—रस्ता ( बुद्धिमती, पशुपती, आणि करालमाया प्रवेश करितात. )

पशु०—[ स्वगत ] इचीभन, हाथ समदा मान आवांनाच, बाप्याचा जनुम हाथ लई वगांळ लागतुया.-ही बया माझ्या शिकारखान्यामधीं झाडूचं काम करीत व्हती. आन हाथ हिच्या हातांत केरसुनी जाऊनश्यानी तरवार आली हाय नव्ह का ?

बुद्धि०—गडे करालमाये, हाच सेनापतीचा वाडा.-तूं आंत

जा आणि बाईसाहेबांचें पत्र देऊन ये.-जा तूं आतां.-तूं परत येईतों मी आणि पशुपती येथें उभे राहतों.-जा.

[ **करालमाया** जाऊं लागते. ]

**पशु०**---ए बायकु, दादल्याला-घरधन्याला-पुसल्याबिगर चाल-ली दुसऱ्याचश्या घरामंदी घुसायला !

**करा०**---कशापायी एका दादल्याची आवा दुसऱ्याच्या घरामंदी घुसतीया ?-इथ्थल सेनापती बाप्पय न्हाईती, बायाबापड्या हायतीं; ठाव हाय ?

**पशु०**---हाकड बघ.-फिर माग.-हाकड बघ.-रूपमाया दवाड आवा हाय.-माझ्या बायकुला लष्करामंदी वोढण्याचा तिचा डाव हाय डाव-काय ?.

**करा०**---लई दवाड आवा हाय; लष्करामंदी वोढणार हाय.-मग कस म्हनताया ?

**पशु०**---हाय ना ?-अस्स.-समद ध्येनांत घेऊनश्यानी म्हनाव-

**करा०**---कसं म्हनावं ?

**पशु०**---म्हनावं तुझी तरवार बी नग-आन इर्चीमन तुझ धनुख बी नग-आन तुझ बान बी नग, अस्सं-अस्सं-लष्करामंदी हुद्दा बी मला नग. अस्सं.-मग काय होव, मग काय होव ?-बोलना-बोल काय हाव ?

**करा०**---घरधन्यासनी हाव त्येच कारभारिणीलाबी हाव.-काय हाव म्हनावं ?

**पशु०**---म्हनाव पसपती दादला होवा.-त्यो माझा दादला आन मी त्याची बायकु.-हे बग-रुद्रमायाबी दादला नग, रूप-मायाबी दादला नग, प्रमिलाबी दादाला नग,-मग कोन होवा ?

**करा०**---आपुन म्हनाल त्योच दादला होवा नव्हका ?

पशु०—म्हन्हावं पस्पती दादाला होवा.—ह्या बायामंदीं को-नाला बी दादला केलास तर तूं माझी बायकु नवस—सांगुतुया.—घरामंदीं पाऊल नाहीं घालूं देनार.—बजावतुया. [ करालमाया जाते. ]

बुद्धि०—अरे पशुपती, तूं वेडा तर नाहींसना?—बायका का कोठें बायकांचे दादले होतात.

पशु०—त्येचा काय नेम हाय!—आमच्या बाच्या वक्ताला इस्तरी राज कवा व्हत?—आतां झालं कीं न्हाई?—असंच हाय.—ह्या समद्या आवांचा कावा आतां ध्येनांत येऊं लागला.

बुद्धि०—बायकांचा कोणचारे कावा?

पशु०—कावा असा हाय, असं इस्तरीराज करुनश्यानी आ-वाच एक दिवस बाप्पे व्हनार नव्हका? ह्या आवा कवा पुरुस व्हत्याल आमच्या वाला बी उमगायच न्हाहीं. मग समद्या मर्दांच्या बायका ह्या आवा पळवून न्येनार नव्हका?

बुद्धि०—( स्वगत ) चांगला वेडा आहे मेला. ह्या वेडगळाला जर मरणाचें भय दाखविलें तर माझ्या मनाप्रमाणें वागावयाला हा तेव्हांच तयार होईल. ( उघड ) हें पहा पशुपती तुला एक विचारावयाचें आहे मला.

पशु०—काय?

बुद्धि०—प्रमिलाराणीसाहेब तुझा कडेलोट केल्याशिवाय रा-हणार नाहींत.—तुझ्या मनांतून तुझा जीव वांचवायचा आहे का?—मी सांगेन तसें वागल्याशिवाय तुझा जीव कांहीं वाचावयाचा नाहीं.

पशु०—कस जगांव म्हनतीस?

बुद्धि०—हें पहा, आमच्या ह्या स्त्रीराज्यामोंवतालच्या जंगलांत वाघ फार आहेत. त्यांचें भय जर आम्हांला वाटलें नसतें तर एकएकट्या आम्ही पुरुषराज्यांत केव्हांच पळून गेलों असतों. सरस्वती

नदीपलीकडच्या भयंकर जंगलांतील हिंस्रपशूंच्या तावडींतून सोडवून तूं जर मला श्वेतकेतुमहाराजांच्या पुरुषराज्यांत घेऊन जाशील तर—

पशु०—करालमायेला हाथ सोड्नश्यानी तुला पळवून नेऊं व्हय?---असली तरवार बदादुर आवा आमासनी साफ बायकु नको, सांगुतुया.

बुद्धि०—( स्वगत ) काय मेला पशु आहे! ( उघड ) तसं नव्हे पशुपती, मला ह्या स्त्रीराज्यांतून सोडवून माझ्या नवऱ्याचें घरीं नेऊन पोंचीव म्हणजे झालें.

पशु०—अन अर्ध्यामुर्ध्या पुरुस झालेल्या आवाला तुझा दादला कशापायीं घेईल घरामंदीं?

बुद्धि०—घेतील हो.—ते केव्हांही माझ्यापाशीं दुष्टपणानें वागायचे नाहींत.--शिवाय माझा मुलगा मोठा झाला असेल, त्याला केव्हां पाहिनसें मला झालें आहे.--पशुपती, कसेंही कर आणि मायलेकरांची भेट करून देण्याचें एवढें पुण्य पदरांत घे.--चल, पशुपती ती पहा करालमायाही पत्र पोंहचवून आली. चल, आपण कोतवाल चावडींत जाऊं. [ जातात ]

---

## प्रवेश चौथा.

---

स्थळ—रूपमायेचा महाल. रूपमाया बसली आहे.

रूप०—[ स्वगत ] आईनें पत्रांत लिहिलें आहे, कीं पुष्पधन्वा महाराजांचें मजवरचें प्रेम कांहीं केल्या कमी होत नाहीं. मी

जर त्यांच्याशीं लग्न करण्यास कबूल झालें नाहीं तर—आई काय म्हणते पत्रांत [ पत्र वाचीत ] ‘ तुझ्यावरील प्रेमानें बेहोष होऊन तुला आपल्या ताब्यांत घेण्याकरितां स्त्रीराज्यावर ते हल्ला करतील. ’ ——बरें केला तर केला हल्ला त्याचें काय इतकें !—‘ मग त्याचा परिणाम काय होईल हें मला लिहितां येत नाहीं. ’—परिणाम काय व्हावयाचा आहे? एक बायकांचा तरी पराभव होईल किंवा पुरुषांचा तरी होईल. बायकांचा पराभव झाला आणि पुरुषांनीं आह्मांला कैद केलें—नकोग बाई हा विचार! बळजोरीनें आमच्यांशीं लग्न लावण्याची वेळच आह्मी येऊं देणार नाहीं. स्त्रीराज्याचा जर पराभव झाला तर मेल्यांनो, पक्कें ध्यानांत ठेवा ह्या रूपमायेच्या प्रेताशींच—जाऊंद्या, आपण होऊन अमंगळ बोला कशाला?—बरें लढाईंत बायकांचा जय झाला, आणि पुष्पधन्वामहाराजांना मीं कैद करून येथें आणलें,—मी जसा हुकूम करीन तसे ते वागूं लागले,—खरेंच असें झाल्यावर बायकांनीं पुरुषांशीं लग्न करण्यास काय हरकत? तसेंच लढाई करून त्यांचा पराभव करण्यापूर्वींच पुष्पधन्वामहाराज अगदीं माझ्या मुठींत आले,—बरें—मग—मग—त्यांच्याशीं लग्न लावण्यांत काय मला कमीपणा? [ **वाग्मती** येते ]

**वाग्म०**—सरकार, कसूर माफ. सरकार, ती करालमाया पुन्हा परत आली आहे. आणखी सरकारचें दर्शन घेऊन तिला एक विनंति करावयाची आहे. जसा सरकारचा हुकूम.

**प्रमि०**——जा, तिला आंत पाठवून दे. [ **वाग्मती** जाते. ]

**रूप०**—आतांच हें पत्र देऊन कांहीं न बोलतां निघून गेली. पुन्हा कां बरें परत आली? कांहीं विसरली असेल. [ **करालमाया** येते. ] कांग, पुन्हां का परत आलीस? आईनें आणखी कांहीं निरोप का सांगितला आहे तुजपाशीं?



कराल०—तवा मी पसू नव्ह तर कोन हाय सरकार ? (पृ. ४९)

कराल०—आईसाब मला कसं म्हनत्यात—"ए करालमाये, ए करालमाये, तुझा दादला पस्पति तवा तूं बी पसू हैस." —म्या म्हटलं 'जी सरकार, खर आहे सरकार.' आमसनी दादला सोडूं नव्हस वाटतया, मुलं बाळं हाव्याति, सरकारवानी आईबांना हामी लाथाडलं न्हाई, माझा बा पुरुस, माझा दादला पुरुस, माझा भाऊ पुरुस, माझा काका पुरुस, माझा मामा पुरुस. माझा मावसा पुरुस, माझा मुलगा बी पुरुस, ह्या समद्या पुरुषासनी मारूनश्यानी टाकाव अशी सरकारवानी आमासनी बुद्धिबी न्हाई.—तवा मी पसू नव्ह तर कोन हाय सरकार? म्हणूनश्यानी आईसाबासनी मी इनंति केली 'जी सरकार मी पसूच हाय!'

रूप०—आहेस खरोखर पशूच आहेस, बरें मग पुढें?

करा०—तवा सरकारासनी निरोप सांगायला मंतार करूनश्यानी हाथ गुंडाळूनश्यानी योक इस्तु दिली हाय नव्हका? [वस्तु देते] ह्या करालमायपाशीं आईसाबांनीं दुसरा कायबी निरोप सांगितला न्हाई.

रूप०—हें एवढें सांगायला तूं इतका वेळ घेतलास, खरोखर पशू!

करा०—सरकारचं दरसन झालया, बिदागी व्हावी सरकार.

रूप०—वाग्मती, अग वाग्मती, अशी इकडे ये पाहूं [वाग्मती येत.] या करालमायेला कोतवालींत पोंचवायला कोणाला तरी पाठीव, कोतवालाला कळीव; म्हणावें हिची व्यवस्था चांगल्या रीतीनें ठेवा.

वाग्म०—आज्ञा सरकार.

रूप०—आणि हें पहा, पांडवसेनेंतला तो दुय्यम वकील माझ्या भेटीला यावयाचा आहे. तो आला म्हणजे त्याला आंत पाठ-

वून दे.—करालमाये जा बरें जा. [ करालमाया व वाग्मती जातात.]

**रूप०**—श्रीविचिंत आई पट्टाभिषिक्त आहे, अशी सर्व हिमाचलांत तिची ख्याति आहे. आईनें खरोखरच कांहीं मंत्र, जादू, टोणा, केला नसेल ना? ह्या वस्तूवर माझी नजर गेली आणि तेव्हांपासून मन असें भांबावल्या सारखें कां झालें आहे?—नवरा, बाप, मुलगा, ह्यांना मान देऊन त्यांच्याशीं प्रेमानें वागणारी ही करालमाया पशू, का पुरुषांचा द्वेष करून आईबापांच्या ममतेला मुकणारी, पतीच्या प्रेमाला पारखी होणारी, आणि मुलांच्या लडिवाळपणाला अंतरणारी ही रूपमाया पशू?—'आई' 'आई'—ह्या शब्दांत कांहीं जादू आहे का?—मंतरलेल्या ह्या वस्तूकडे पहावयाचें नाहीं, असा मीं बेत केला होता; पण आईनें पाठविलेली, आईच्या जादूबाहेर मी कशी जाऊं? [ सोडून तसबिरीकडे पाहून हंसून ] ही तसबीर आहे.—कोणाची बरें?—पुष्पधन्वामहाराजांची.—नाहीं, ह्या तसबिरीकडे पहावयाचेंच नाहीं.—हातांनो, माझ्या दृष्टीचे आड ही तसबीर नेण्याचें तुमच्यांत सामर्थ्य नाहीं काय?—ह्या चित्रांत जादू आहे, मंत्र आहे.—मी नको म्हणत असतांना डोळे ह्या रूपावरून हलत नाहींत.—दृष्टि येथेंच खिळून कां रहावी?—बा चित्रा, तूं आईचा जासूद आहेस, आईचा निरोप काय तो चटदिशा सांग पाहूं.—( दचकून ) हें काय मी पहात आहें!—मी हंसले; हेंही चित्र हंसतें! हें कसें?—मीं प्रेमानें ह्या चित्राकडे पाहिलें; हें चित्रही प्रेमानें मजकडे पहात आहे!—ह्या चित्रांत जीव आहे का?—जीव आहे.—जादू आहे.—बा चित्रा, माझ्याकडे पाहून गालांतल्या गालांत प्रेमानें कां बरें हंसतोस? प्रेमानें भरलेल्या नजरेनें माझें मन कां आकर्षण करून घेतोस?—नाहीं, हें चित्र जिवंत नाहीं.—वेडे रूपमाये, फसलीस, पुरी फसलीस! आईनें

पाठविलेल्या पुष्पधन्वामहाराजांच्या नुसत्या तसबिरीकडे पाहून [**पुष्पधन्वा** येतो व मागें उभा रहातो. ] जर तुझें मन तुझ्या ताब्यांतून गेलें, तर पुष्पधन्वामहाराजांना प्रत्यक्ष पाहिल्यावर काय करशील?—पुष्पधन्वामहाराजांवर माझें प्रेम आहे खरें; पण स्त्रीराज्याच्या ह्या कार्याकरितां मीं माझें मन आवरून धरलें आहे.—मी म्हणेन त्याप्रमाणें वागायला पुष्पधन्वामहाराज कधीं तरी तयार होतील काय?—ही निर्जीव वस्तु—ही अचेतन तसबीर—जर माझ्या प्रेमामुळें मार्दवली गेली आहे तर, वेडे रूपमाये, प्रेमबलानें पुष्पधन्वामहाराजांना आपल्या मुठींत नाहीं का तुला ठेवतां यावयाचें?—बायकांचीं आर्जवें पुरुष कधीं काळीं करतील का?—पुष्पधन्वामहाराज, स्त्रीराज्य मोडायला एकच उपाय आहे, बायकांचीं आर्जवें करून—बायकांच्या पाया पडून—

**पुष्प०**—( पुढें येऊन ) रूपमाये, हा तुझा दास तुझ्या पाया पडायला तयार आहे.

**रूप०**—कोणरे मेल्या तूं?—हीच शिष्टाई करायला आलास वाटतं!—काय मेले म्हातारे तरी चोमडे!—मूर्खा, तुझ्या त्या शुभ्र दाढीकडे तरी पहा. आहारे थेरडा!—दिवे ओवाळा मेल्याच्या अकलेवरून!—पांडवसेनेचें सामर्थ्य समजून सांगायला येथें आलास नव्हे? आणि असला हा लोचटपणा!—परपानंगीनें स्त्रीराज्यांत आलेल्या म्हाताऱ्यांचा देखील कडेलोट केला पाहिजे.—नाहींग बाई कोणाही मेल्या पुरुषावर विश्वास टाकून सोय नाहीं. हे जरख म्हातारे मेले, आणि त्यांची ही अशी बुद्धि!

**पुष्प०**—रूपमाये, तुझ्या दर्शनानें ती निर्जीव तसबीर जर सजीव होते, तर तुझ्या ह्या मोहक रूपाच्या प्रभावानें माझ्या ह्या पांढऱ्या दाढीची आठवण मला राहिली नाहीं, तर त्यांत काय नवल?

**रूप०**—ह्या लघळपणाबद्दल, थेरड्या, स्त्रीराज्यांतून तुला आ-ग्यांच्या आतां हांकलून दिलें जाईल, इतकेंच नव्हे तर युद्ध करून पांडवसेनेचा पराभव आम्हीं केल्यानंतर पिंजऱ्यांत कोंडून तुला मी माझ्या शिकारखान्यांत ठेवीन.

**पुष्प०**- तुझ्या सौंदर्यानें शिकार करून हें सावज जिवंत पकडून आणून प्रेमाच्या पिंजऱ्यांत कोंडून ठेविलें, अशा रीतीनें सर्व बायकांच्या पुढें माझें प्रदर्शन तुला करतां यावें म्हणून तर मी आतां तुझ्या महालांत आलों.

**रूप०**—मेल्या तू पांडवांचा वकील म्हणून शिष्टाई करण्यास जर स्त्रीराज्यांत आला नसतास तर आतांच एकाद्या हिंस्रपशूप्रमाणें तुला लाखडी गजांच्या पिंजऱ्यांत कोंडून ठेविलें असतें; आणि एक अत्यंत क्रूर, पाजी, बेमुर्वत, पुरुष थेरडा धरून आणला आहे; त्यास सर्वांनीं पहाण्यास यावें, म्हणून दवंडी पिटविली असती.

**पुष्प०**— मी आतां जो तुझ्या महालांत आलों तो पांडवाचें सामर्थ्य किती आहे हें सांगण्याकरितां आलों नसून पुष्पधन्व्याची नम्रपणाची विनति तुझ्या पायांपाशीं सादर करण्याची संधि मिळावी म्हणून आलों. -प्राणप्रिये—

**रूप०**—पुष्पधन्वामहाराजांच्या वतीनें माझीं आर्जवें करण्या-करितां आलासना? हीं अशींच आर्जवें करायला तुला तुझ्या मालकानें सांगितलें वाटतें! पुष्पधन्वामहाराज, ह्या थेरड्यावर वि-श्वास टाकून तुम्ही पुरे पुरे फसला! महाराज, आपण ज्या तरुणी-वर प्रेम करीत आहां, जी तरुणी उलट आपणावर प्रेम करते, तिलाच ह्या वृद्ध कपीनें ' प्रिये ' म्हटलेलें ऐकून आपणाला काय वाटेल बरें!-कायरे, ए बुढ्या, तुला काय वाटतें? पुष्पधन्वामहा-राजांवर माझें मन बसलें असून केवळ स्त्रीराज्याच्या उत्कर्षाकरितां

मी त्यांच्याशीं लग्न करण्यास नाकारतें आहें हें तुला माहीत असतांना पुन्हा माझ्याशीं लवळपणा करतोस, तेव्हां पुष्पधन्वामहाराजांहून तुझ्या म्हातारपणाची ही चेहऱ्याची छबी अधिक मनोहर आहे असें का, गध्या, तुला वाटतें ?-बघ मेल्या, बघ, ही त्यांची तसबीर नीट पहा.-बायकांचें मन आकर्षण करून घ्यायला असे कमळासारखे प्रफुल्लित आणि सतेज डोळे असावे लागतात हां! हें हंसरें मुखकमल, ही चेहऱ्याची कुर्रेबाज ऐट, गाढ प्रेमालिंगन द्यायला मला हुकूम करणारें हें प्रियाचें विशाल वक्षस्थळ-पहा, मेल्या, नीट डोळे फाडून पहा; आणि लज्जेनें, थेरड्या, आपली पांढरी दाढी लपीव.-नकोरे मेल्या, नको, माझ्या पुष्पधन्वामहाराजांकडे पाहूं नकोस.—कसा मेला मत्सराच्या विषारी नजरेनें माझ्या प्राणनाथाकडे पाहतो आहे!-नाहींच मी त्यांना तुझ्या नजरेला पडूं द्यावयाचीच नाहीं. त्यांना मी अशी पदराचे आड लपवून धरणार.

**पुष्प०**—सुंदरी, पुष्पधन्व्यापेक्षां माझ्यांत काय कमी आहे ?

**रूप०**—काय कमी आहे ?-काय कमी आहे !

**पुष्प०**—पुष्पधन्व्यापेक्षां माझे डोळे कांहीं वाईट नाहींत ?-पुष्पधन्व्याच्या तारुण्याच्या हातून जें काम झालें नाहीं, पांडवसेनेचा सेनापति ह्या नात्यानें पुष्पधन्व्याच्या हातून जो पराक्रम झाला नाहीं, तें कार्य सहज लीलेनें करण्याचें सामर्थ्य ह्या माझ्या दाढींत आहे. —प्यारी, माझी पक्की खात्री आहे, पुष्पधन्व्याची ती तसबीर फेंकून देऊन ह्या दाढीचेंच कौतुक तूं करीत राहशील. सुंदरी—

**रूप०**—मी ऐकून घेतें असें पाहून हा थेरडा फारच चळत चालला.-मेल्या, एकदम बाहेर हो.-ह्या पावलीं असा बाहेर जा:-नाहींतर तुझ्या दाढीला धरून तुला फरफर ओढीत आंगणांत

नेऊन तुझी अशी शोभा करितें, मेल्या, तुला जन्माचीच आठवण राहील –चल हो चालता.

पुष्प०—( गुडघे टेंकून ) नाहीं, रूपमाये नाहीं.–तूं कांहीं केलेंस तरी तुझ्या पायांत हा तुझा दास असाच घुटमळत राहणार—

रूप०—दाढी धरून ह्या मेल्याला बाहेर ओढून काढल्याशिवाय हा ताळ्यावर यायचा नाहीं. ( दाढीला धरून ओढते. दाढी हातांत येते. तजबिरीकडे पाहून **पुष्पधन्व्या**कडे पहात दचकत मागें सरून प्रेमानें पाहून उभी राहते. **पुष्पधन्वा** इतर पांढरे केस टाकून देतो. ]

पुष्प०—रूपमाये, तुझ्या हातांतल्या त्या माझ्या तसबिरीचा मला हेवा वाटतो.–त्या तजबिरींतला पुष्पधन्वा तुझ्या पाया पडला नाहीं; तुझ्यापुढें गुडघे टेंकून त्यानें तुझीं आर्जवं केलीं नाहांत; संग्रामदेवता अंगीं चढल्यामुळें क्रूर व लाल झालेल्या त्या तसबिरींतल्या माझ्या डोळ्यांनीं तुझ्या कोमल गालांवरील प्रेमाची आरक्तता मनमुराद पहावी, आणि तुझ्या प्रेमाशिवाय जगांतली कोणचीही वस्तु ह्या वेळीं पाहण्याचें नाकारणाऱ्या माझ्या ह्या डोळ्यांना तुझ्या चेहऱ्यावरील प्रेमाचं गोड हास्य दाखविण्याचें तूं टाळावेंस, हा पंक्तिप्रपंच तुला शोभतो काय?–खरोखर त्या तसबिरीचा मला फार हेवा वाटतो.–तुझ्या हातांतून ही अशी काढून घेतल्याशिवाय ( काढून घेतो. ) पाहिलेंस मला नीट?–आतां खरें सांग, ह्या तसबिरींतल्या पुष्पधन्व्यापेक्षां मी फारसा वाईट नाहींना दिसत?

रूप०—मी काय सांगूं महाराज? म्हाताऱ्याचें सोंग घेऊन माझें आपल्यावरील प्रेम मला बोलून दाखवायला लावलेंत, ह्याहून आणखी निराळें ही दासी काय सांगणार?–खरेंच गडे, येथें इतक्यांत चुकून जर एखादी पहारेकरीण आली–आणि तिनें आपल्याला पाहिलें तर—



पुष्प०—रूपमाये, तुझ्या हातांतल्या त्या माझ्या तसबिरीचा मला हेवा वाटतो.
(पृ. ५४.)

पुष्प०—तर काय होणार आहे? पुष्पधन्वा स्त्रीराज्यांत आले-ल्याची बातमी प्रमिलेला सांगेल. आणखी काय होईल?

रूप०—नकोग बाई, इतक्यांत उघडकीस नको यावयाला—आतां पुन्हां गडे, मगाच्या सारखें म्हातारें व्हायचें होतें.

पुष्प०—पुरुष काय बायको मिळविण्याकरितां लहान होतील, म्हातारे होतील, किंवा बायकांचींही सोंगें घेतील.—पण कायग, मगाचा तो मेला, हलकट, चोंबडा, लघळ, गद्धा, थेरडा, म्हातारा तुझ्या डोळ्यांपुढें सुद्धां नकोना?

रूप०—पुरे मेली थट्टा. व्हायचें गडे पुन्हां लवकर म्हातारे.

पुष्प०—तूं मिळाली नसतीस तर लवकर म्हातारा होऊन संन्यास घेण्याचा माझा विचार होता.—पण आतां—म्हातारपणाची गोष्टच काढूं नकोस. आपण सर्व जन्म तुझ्या सहवासांत तरूणच रहाणार.

रूप०—ही खोटी दाढी लावून मगाशी इतका वेळ माझा का अंत बघायचें झालें?

पुष्प०—माझ्या मनांत प्रारंभींच आलें कीं, ह्या रूपानेंच तुला एकदम भेटावें म्हणून पण—

रूप०—पण काय झालें?

पुष्प०—रूपमाये, तूं जसजशी या दाढीवर रागावत होतीस तसतसें तुझें रूप खुलूनच दिसत होतें.—त्या वेळची तुझी ती ऐट—तो बाणेदार चेहरामोहरा—तो गोड गोड आवेश—अशी रम्य भामा पहात असतांना दाढी दूर करण्याची शुद्ध होती कोणाच्या हाताला?—तुझ्या रागामुळें तुझ्या लावण्याच्या लहरींना पूर आला होता—

रूप०—पुरे झालें हो वर्णन आतां.—ही दाढी घ्यायची होती.

पुष्प०—पुढच्या माझ्या सर्व बेतांत माझ्या म्हणण्याप्रमाणें वागावयाचें वचन दिल्याशिवाय मी नाहीं पुन्हा म्हातारा होणार.

रूप०—मग गडे ह्या महालांत फार वेळ बसतां कामा नये.—त्या पलीकडल्या महालांत चलायचें होतें. तेथें आपण मोकळेपणानें बोलून पुढचे बेत ठरवूं.

[ जातात. ]

## अंक दुसरा समाप्त.



# अंक तिसरा.

## प्रवेश पहिला.

—०*०—

स्थळ:—सरस्वतीनदीवरील चौकी. जागरूक व सत्यमाया प्रवेश करितात.

**सत्य०**—जागरुका, शिकारीला न जातां तपोभूमीकडे तूं माझ्या बरोबर यावें म्हणतोस ?

**जाग०**—जी सरकार, तपश्चर्येंत जशी मला मजा वाटते, तशी शिकारींत नाहीं वाटत.

**सत्य०**—कां बरें, असें का वाटतें तुला ? शिकारीसारखी मर्दानी मौज नाहीं, असें पुरुष म्हणतात.

**जाग०**—पुरुष म्हणत असतील; पण मी आपला सरकारच्या मताचा आहे.—सरकारला जसें वागावेंसें वाटतें, तसेंच मलाही सरकाईनें विचार केल्यावर वाटूं लागलें आहे.—माझें तर आग्रहाचें म्हणणें आहे कीं, बायकांनीं पाहिजे तर शिकारीला जावें, पण आम्ही पुरुषांनीं हातांत शस्त्र घेणें—

**सत्य०**—कायरे जागरुका, तुम्ही आजकालचे पुरुष बायकांहून बायका आहां का ?

**जाग०**—आम्ही दिसावयाला पुरुष असलों, तरी आपल्यासारख्या स्वातंत्र्यप्रिय बायकांच्या बायकाही व्हावयाला आम्ही लायक नाहीं. हल्लाच्या काळांत जो पुरुष शस्त्राची गोष्ट बोलेल

त्याची तर टरच उडवली पाहिजे. म्हणून मृगयेला न जातां सरकारस्वारीबरोबर तपश्चर्येला येईन म्हणतों.

**सत्य०**—फार उत्तम !—जागरुका, हिमाचलाच्या पहाडांतून वाहणाऱ्या ह्या सरस्वतीनदीच्या तीरावरल्या शांत वनभूमीकडे पाहिलें म्हणजे आपली ही भूमि तपश्चर्येकरतांच आदिमायेनें निर्माण केली असावी, असं मला वाटतें.

**जाग०**—सरकार, ह्या भूमींतले सर्व प्राणी एक बायका तरी असणार, किंवा पुरुषासारखे पुरुष जन्मले तरी चटदिशीं तपस्वी होऊन पुन्हा अर्धवट बायकाच होणार, हें ठरलेलें आहे; तेव्हां म्हणतों मला एक संशय आला आहे.

**सत्य०**—काय संशय आहे ?

**जाग०**—संशय म्हणजे असा, ह्या भूमींत कालांतरानें बायकांचे दोन प्रकार होणार; एक बायकांच्या जन्माला आलेल्या बायकी बायका, आणि दुसरा पुरुषांच्या जन्माला आलेल्या पुरुषी बायका.—अशा रीतीनें हा सर्व देश बायकी थाटाचा झालेला पाहून जर परदेशचे पुरुष ह्या प्रदेशांत घुसले तर त्यांनीं ह्या प्रदेशांत अमके पुरुष व अमक्या बायका हें ओळखावें कसें ?

**सत्य०**—जागरुका, तूं म्हणतोस तें खरें आहे.—बायकोपणाला लालचावलेल्या पुरुषी बायकांच्या दुर्गुणांपुढें बायकी बायकांचे सद्गुणही लोपल्यावांचून रहावयाचे नाहींत. खऱ्या बायकांच्या हातून आत्मसंयमन होईल, त्यां स्वार्थत्यागी, निग्रही व धाडसी निपजतील; पण ह्या पुरुषी बायकांना एवढमें देखील कमी पडलेलें खपायचें नाहीं. त्या नेहमीं पराव‌लंबी राहून परदेशच्या पुरुषांच्या घरोघर जाऊन, त्यांच्या पुढें नम्र होऊन, खऱ्या बायकांच्या स्वाभिमानाच्या तेजाला आपल्या नीच कृतीनें काळोखी आणतील. मग त्यांच्या

ह्या हलकट व नीच कृत्यांवरून पुरुषी बायका ओळखण्यास कोणासच अडचण पडणार नाहीं.—जागरुका, त्या चौकीवर कोणी पहारेकरीण असेल तिला विचार पाहूं, महाराणीसाहेबांची स्वारी येथें केव्हां येणार तें.

जाग०—( चौकी जवळ जाऊन ) ह्या चाकींत कोणी पहारेकरीण आहे का? अग कुणी असला तर बाहेर या.—गुरुमहाराजांची स्वारी आली आहे; दिसत नाहीं?

सत्य०—कोणी आहां काग? अशा जरा पुढें या पाहूं.

( गळ्यांत धनुष्य अडकवलेला **मैत्रेय** चौकींतून बाहेर येतो. )

मैत्रे०—नमस्कार, गुरुमहाराज.

सत्य०—नवरा मिळून मुलेंबाळें होण्याचा प्रसंग न येवो.

मैत्रे०—पूर्वीं झालेली नाहींना मरणार?

जाग०—अरे मूर्खा, गुरुमहाराजांचा आशीर्वाद आहे. आतां ह्या पुढें तुला मुलगाही व्हावयाचा नाहीं, आणि मुलगीही व्हावयाची नाहीं.

मैत्रे०- माझी बायको मेलेली आहे, तथापि यापुढें मूलबाळ माझ्या नाशिबीं खरोखर नाहीं ना?

सत्य०—मूर्खा, बायको मेली सगळें झालें, आतां कसलें मूलबाळ!

मैत्रे०—नाहीं म्हटलें, ह्या राज्यांतील एकादी बाई गळ्यांत पडली तर कसें करूं? पुढें जर नाशिबीं मुलबाळ नसलें तर म्हातारपणीं लग्न करून एकाद्या गरीब गाईच्या गळ्याला मंगळसूत्राचा फांस कशाला लावूं? [ पडद्यांत शिंगें वगैरे वाजतात. ]

जाग०—महाराणीसाहेबांची स्वारी आली वाटतें!

[ **प्रमिला, अर्जुन, बुद्धिमती, वाग्मती,** व इतर स्त्रिया प्रवेश करतात. ]

सत्य०—महाराणीसाहेब, सरस्वतीनदीच्या तिरीं आपल्याला आम्ही दर्शन देऊं म्हणून वचन दिलें होतें, त्याप्रमाणें जंगलांत तपश्चर्येला जाऊन बसण्यापूर्वीं आपली वाट पाहत आम्ही इतका वेळ येथें उभ्या राहिलों आहों.

प्रमि०—गुरुमहाराज, ह्या वकीलसाहेबांनीं येथली वनश्री पूर्वीं पाहिली नव्हती; यामुळें वनशोभा पाहत पाहत जरा सावकाश आलों. आम्ही चार पांच दिवस शिकार करीपर्यंत राजधानींत राहून प्रधानजी स्थिरमाया आमच्या मागें राज्यकारभार कसा चालवितात, हें पहायाचें सोडून जंगलांत तपश्चर्येला तीन दिवस बसण्याचा विचार गुरुमहाराजांनीं का केला?

सत्य०—पुरुषांशीं लग्न करून मुलेंबाळें होऊन पुरुषांच्या सत्तेंत बायका सांपडूं नयेत, अशी ह्या स्त्रीराज्याची प्रतिज्ञा ह्या वेळीं डळमळूं नये, म्हणून मी तपश्चर्येला बसून आदिमायेचा धांवा करणार आहें.—प्रमिले, मुलाबाळांची प्रीति ही बायकांना परतंत्र करण्याची मुख्य युक्ति असें पुरुष समजतात. मुलें झालीं, कीं पडलीं सगळीं मुलांचीं कामें बायकांच्या गळ्यांत; आणि मग चालले मेले हे पुरुष दुनियेभर स्वतंत्रपणानें उनाडायाला. माझें असें मत आहे, कीं फार प्राचीन काळीं ज्यावेळीं बायका पूर्ण स्वतंत्र होत्या, आणि केराच्या कोपऱ्यांतल्या खराट्याप्रमाणें पुरुषांना वागवीत होत्या, त्या वेळीं लहान मुलांबाळांचें संगोपन करायचें काम पुरुषांच्याचकडे होतें. पूर्वीं पुरुष आई जरी नाहीं तरी दाई खात्रीनें होते. त्यावेळीं तान्हुल्यांच्या संगोपनाचें दाईचें काम पुरुषांकडेच असे, हें सिद्ध करणारी खूण ह्या मेल्यांच्या वक्षस्स्थलावर अद्याप आहे. पण बायांनो; पुढें पुरुषांच्या मायावी व फसवी जाळ्यांत जसजशा आम्ही बायका सांपडूं लागलों, तसतसें ह्या मेल्या चुकारतट्टू जातीनें तान्हुल्यांना

पाजण्याचेंही काम बायकांच्या गळ्यांत घातलें; आणि तेंव्हांपासून हा केराच्या कोपऱ्यांतला खराटा घरचा मालक होऊन आमची ही स्त्रीजात मेल्या पुरुषांच्या पुरत्या कचाट्यांत सांपडली !—पांडवांच्या सेनेशीं लढून पूर्वीच्या दाईच्या स्थितीला पुरुषजातीला नेऊन पोंचवण्याची अपूर्व कामगिरी, ह्यावेळीं प्रमिले, तुझ्या हातून पार पडण्यासंबंधानें आदिमायेचा दृष्टांत काय होता हें पाहण्याकरतां मी आतां तपश्चर्येला जाणार आहें. बाळे, ह्या वकिलाशीं बोलण्या-चालण्यांत पुरा सावधपणा ठेव, एवढच माझें ह्या प्रसंगीं तुला सांगणें आहे.- चल, जागरुका चल. आपण आतां सरस्वतीच्या पलीकडे जाऊं. [ पुलावरून जात असतांना ] बाळे प्रमिले, तूं म्हातारी असतीस तर स्त्रीराज्याचें काम तुझ्या हातून पार पडेल कीं नाहीं अशी शंकाच माझ्या मनांत आली नसती.—जगांतल्या सर्व स्त्रिया-मध्यें ती अत्यंत वृद्धा आदिमाता—ती पहिली जरठा आदिमाया—ती पुराणस्त्री आदिशक्ति—आपलें सर्व वार्धक्य ह्या वेळीं प्रमिलेला देवो. [ **जागरूक** व **सत्यमाया** जातात. ]

**प्रमि०** - सैनिकहो, गुरुमहाराजांना त्यांच्या तपश्चर्येच्या गुहे-जवळ पोंचवून या. [ **बुद्धिमती**, **वाग्मती** शिवाय सर्व स्त्रीसेना जाते ]

**अर्जु०**—खरंच महाराणीसाहेब, दातांचें बोळकें झालें आहे, गालाला सुरकुत्या पडल्या आहेत, अशी एखादी जरठा जर स्त्रीरा-ज्याच्या सिंहासनावर बसली असती, तर माझ्या सारख्या वकि-लाला शिष्टाई करण्याचा त्रासही पडला नसता.

**प्रमि०**---तें कसें वकीलसाहेब ?

**अर्जु०**—कारण असल्या म्हाताऱ्या बायकांनीं जर स्त्रीराज्याची संस्थापना केली, तर ती मोडण्याच्या भानगडींत कोणचेच पुरुष पडणार नाहींत.—सरकारस्वारीच्या तारुण्याचा आतां कोठें

विकास होऊं लागला आहे; तारुण्याच्या तजेल्यानें सरकारच्या नेत्रकटाक्षांना जर तीव्रता आली नसती–

प्रमि०—माझ्या तारुण्यामुळें माझ्या हातांतले हे बाण अधिक तीव्र होतील, असें मेल्या पुरुषांच्या अनुभवाला येईल.

अर्जु०—तारुण्याच्या आरंभाची चंचलता दाखविणाऱ्या लज्जेचा लाल छटा ह्या गालावरून त्या गालावर जात असतांना सरळ नाक आड आल्यामुळें जर एकदम खालीं हनुवटीवर पसरून दुसऱ्या गालावर चढला नसता–

प्रमि०—स्त्रीराज्यांतल्या बायकांच्या गालावरची लाली म्हणजे पुरुषजात जाळणारी प्रत्यक्ष आगच होय.

अर्जु०—आपल्याला न जुमानतां लाली ह्या गालावरून त्या गालावर गेलेली पाहून नाखूष झालेली नासिका किंचित तेढी बाकी होऊन–

प्रमि०—असें! असें! रागानें वाकडी झालेली नासिका बेशरमपणानें बहकणाऱ्या पुरुषांना आम्ही असें मुरगळून फेंकून देऊं म्हणून तुम्हांला बजावीत आहे.

अर्जु०—त्यामुळें नाकांतली नथ आपोआप उडून लावण्याच्या उसळणाऱ्या तरलत्वांत हलणाऱ्या मोत्यांच्या तेजाच्या लहरींचा जर भर पडली नसती. तर सरकाराकडे शिष्टाई करण्याकरितां मला पाठविण्याचें अर्जुनमहाराजांना कांहीं प्रयोजनच नव्हतें.

प्रमि०—बरें लवकरच हें चऱ्हाट आटपलें, नाहीं तर तुमच्या त्या मेल्या अर्जुनाला माझ्या बाणाचें सामर्थ्य समजण्यापूर्वीच ह्या धनुष्याचें बल तुमच्या अनुभवाला आलें असतें. पण वकीलसाहेब, आमच्या तारुण्यावर आपण जें एवढें लांबलचक कवित्व केलें त्यांतला हेतु आम्हाला समजला नाहीं.

**अर्जु०**—हेतुबितु दुसरा कांहीं नाहीं. सत्यमायेच्या आशीर्वादानें सरकारचें शरीर कांहीं म्हातारें झालेलें नाहीं, पण—

**मैत्रे०**—सरकारचें मन म्हातारें होतें कीं काय अशी भीति अर्जुन—

**अर्जु०**—महाराजांच्या ह्या वकिलाला वाटतें; पण सरकारला माझ्या वर्णनानें राग आलेला पाहून ती भीति आतां उरली नाहीं. अर्जुनमहाराजांचा मला असा हुकूम आहे कीं, त्यांचा निरोप म्हातारें शरीर किंवा म्हातारें मन न ऐकेल, अशाच वेळीं सरकारच्या पायांपाशीं निवेदन करावा. ह्या शिकारीच्या प्रसंगानें तशी संधि मला मिळाली म्हणजे मी माझा निरोप सरकारापाशीं—

**प्रमि०**—अस्सें! अस्सें!—कांहीं हरकत नाहीं. तुमच्या त्या मेल्या अर्जुनाचा निरोप शांतपणानें ऐकून घेणारी प्रमिला मनानें म्हातारीच आहे, असें तुमच्या प्रत्ययास येईल.—वकीलसाहेब, तुम्ही या प्रमिलेला काय समजतां? शरीरसामर्थ्यानें, मनोनिग्रहानें, किंवा बुद्धिवैभवानें माझी योग्यता कोणताही पुरुषापेक्षां अधिक आहे; इतकेंच नव्हे, तर पूर्वीं ज्या काळीं बायका पूर्ण स्वतंत्र होत्या, त्या वेळीं देखील माझ्या योग्यतेची स्त्री निर्माण झालेली नाहीं. मंत्रद्रष्ट्या महर्षींनाही ज्या स्त्रियांच्या यशांचीं वर्णनें आमच्या प्राचीन ग्रंथांतून लिहून ठेवणें भाग पडलें, त्या स्त्रियांचें यश या प्रमिलेच्या कीर्तीपुढें फिकें पडल्यावांचून राहणार नाहीं. वेदाध्ययन करणाऱ्या पुरुषांना ब्रह्मज्ञान शिकविणारी मैत्रेयी,—ज्यांच्या दिव्यदृष्टीमुळें ऋग्वेदांतलीं कांहीं सूत्रें प्रकाशित झालीं आणि तत्कालीन त्रैकालदर्शी कवींमध्यें ज्यांची ख्याति अशा अदिति, रोमशा, व लोपामुद्रा,—परमहंस दीक्षा घेऊन ब्रह्मविद्येंत याज्ञवल्क्याचा पराभव करणारी गार्गी,—वकील साहेब, हीं पूर्वींचीं नांवें साङ्गून दिलीं,

तरी नवरा मरून स्वतंत्र झाल्यावर परशत्रूपासून स्वराज्याची मुक्तता करणारी विदुला,—किंबा सर्व जन्म ब्रह्मचर्यांत घालवून ह्या मेल्या पांडवांचा आजा, स्त्रियांचा शत्रु जो भीष्म, त्याचा प्राण रणांगणावर घेणारी अंबा,—ह्या थोर व प्रख्यात स्त्रियांच्या मालेंत मेरूमणी म्हणून ह्या प्रमिलेचें नांव घालण्याची पाळी कवींना खात्रीनें येईल. कारण मीं सांगितलेल्या ह्या थोर स्त्रियांनीं आपलें नांव चिरस्थायी केलें खरें, पण तुम्हा पुरुषांच्या नाकावर टिचून आजपर्यंत कोणींच स्वतंत्र स्त्रीराज्य स्थापलें नाहीं. ही अपूर्व कामगिरी ह्या प्रमिलेनें बजावली आहे. स्त्रीराज्य स्थापणाऱ्या ह्या प्रमिलेपुढें, वकीलसाहेब, तुमची सर्व शृंगारिक भाषणें व्यर्थ आहेत. मदनाचें सर्व सौंदर्य व सर्व मोहकपणा जरी त्या मेल्या अर्जुनामध्यें एकवटला असला, तरी तिसऱ्या नेत्रानें मदनाला जाळणाऱ्या त्या पुरुषदेवापुढें मदनाची जी अवस्था झाली, त्याहून अधिक भयंकर अवस्था तुमच्या त्या मेल्या अर्जुनाच्या शृंगारिक निरोपाची माझ्यापुढें होईल, हें पक्कें ध्यानांत ठेवा.—बोला, तुमचा निरोप काय आहे तो बोला.—कां—गप्प कां ?

अर्जु०—म्हातारें मन किंवा म्हातारें शरीर ज्या ठिकाणीं निरोप ऐकील, अशा ठिकाणीं निरोप न सांगण्याबद्दल मला अर्जुनमहाराजांचा हुकूम असल्याविषयीं मीं मघाशीं विनंति केलीच आहे.

प्रमि०—बुद्धिमती, वाग्मती, ह्या म्हाताऱ्याला घेऊन तुम्ही दुसऱ्या नाक्यावरच्या चौकीकडे पुढें चला. ह्या वकीलसाहेबाचा निरोप ऐकून आह्मी मागोमाग येतों. [ बुद्धिमती वाग्मती, व गळ्यांत धनुष्य अडकवलेला **मैत्रेय** जातात. ] वकीलसाहेब, आतां तुम्ही आणि मी ह्यांशिवाय दुसरें कोणी ह्या ठिकाणीं नाहीं. त्या मेल्या अर्जु-

नाचा निरोप मला कळवून स्वतःची फजिती करून घ्यायला तयार व्हा.-कां? आठवत नाहीं निरोप?-झाली फजीती!-माझ्या समोर उभा राहून तुमच्या त्या अर्जुनाच्या शृंगारिक निरोपाचा एक ब्र बोलण्याची धमक पृथ्वीतलावर कोणाही पुरुषाच्या अंगीं असेल असें मला वाटत नाहीं. तुमच्याहून अधिक मुर्दाड व रंगेल एकादा पुरुष जर त्या मेल्या अर्जुनापाशीं असतां तर बरें झालें असतें, कारण माझ्या तेजापुढें असें खजील होऊन मुका होण्याचा तरी प्रसंग त्याच्यावर आला नसता!

अर्जु०—महाराणीसाहेब, अर्जुनमहाराजांचा निरोप इतकाच आहे कीं, स्त्रीराज्यामध्यें सररास राहण्याची परवानगी पुरुषांना जर आपण दिली, तर लढाई न करतां स्त्रीराज्य सहज मोडलें जाईल. कारण शरीरानें, मनानें, किंवा बुद्धीनें पुरुषजातीची योग्यता अधिक असल्यामुळें स्त्रीराज्यांतल्या बायका आपखुषीनें पांडवसेनेचा पुढारीपणा कबूल करतील.

**प्रमि**०—स्त्रीराज्यांत राहण्याची पुरुषांना सररास परवानगी दिली म्हणून काय होणार आहे?-वकीलसाहेब, विश्वांतल्या सर्व पुरुषांच्या प्रखरपणाचें प्रदर्शन आकाशांत करून चांदण्यांना तापविणारा हा मेला पुरुष-हा सूर्य-स्त्रीराज्यांतल्या लतांच्या पल्लवांच्या आस्तरणांतून गाळून आल्यामुळें माझ्या पायांजवळ येऊन पोंचेपर्यंत जसा बायकांहूनही अधिक मऊ होऊन जातो, त्याप्रमाणें या स्त्रीराज्यांत रहावयाला येणारा तो मेला अर्जुन माझ्या दराऱ्यापुढें निस्तेज व कळाहीन होईल. त्या मेल्या अर्जुनाला आपल्या शक्तीची घमेंड असेल तर वाटेल तितके दिवस येथें येऊन राहण्याची आम्ही त्याला परवानगी देतों. पांडवांच्या गर्वाचें हरण होण्याचें पृथ्वीवर जर कोठें ठिकाण असेल, तर तें हेंच होय. आम्ही

शिकारीहून परतून आल्यावर व तुमची दहा दिवसांची मुदत संप-ल्यावर त्या मेल्या अर्जुनाला असा माझा उलट निरोप सांगा, कीं आकाशांत पुरुषांचा दिमाख मिरविणारा हा सूर्य रोजचे रोज आपल्या कोट्यवधि किरणांनिशीं या आमच्या स्त्रीराज्यावर हल्ला करतो त्या-प्रमाणें तूंही आपल्या असंख्यात पांडवसेनेनिशीं, छाती असेल तर, स्त्रीराज्यांत प्रवेश करण्याचा प्रयत्न कर. ह्या मेल्या सूर्याचे सैनिक—हे किरण—आमच्या स्त्रीराज्यांतल्या पहाडावर हापटून हत-वीर्य व निस्तेज होऊन जसे परावृत्त होतात, त्याप्रमाणें आमच्या शौर्यापुढें गलितधैर्य होऊन खालीं मान घालून या स्त्रीराज्यांतून पळ काढण्याची पाळी पांडवसेनेला येईल. पहाडावर हापटून खूप चोप बसल्यामुळें निर्जीव होऊन खालीं गळूं लागणारे कांहीं किरण ह्या वेलींना शरण येऊन त्यांच्या आश्रयानें थंडगार व मऊ झाल्या-नंतरच ह्या लतांच्या मार्फत, ज्याप्रमाणें ह्या सरस्वतीच्या कांठीं प्रवेश करूं शकतात, त्याप्रमाणें बायकांची गुलामगिरी पतकरणारे तेवढे पांड-वसेनेंतले पुरुष आमच्या स्त्रीराज्यांत टिकाव धरून राहूं शकतील. त्या अर्जुनाला असा उलट निरोप कळवा कीं, ह्या प्रमिलेचा गुलाम होण्याची जर तुझी इच्छा असेल, तर लढाई न करतां हें शिपाईचें काम पुढें चालूं दे.—चला वकीलसाहेब शिकारीकरितां जंगलांत प्रवेश करूं. शिकारींत माझें सामर्थ्य पाहिल्यावर माझा निरोप अर्जुनाला खुलासेवार कळवायला तुम्हाला ठीक पडेल. [ जातात. ]

## प्रवेश दुसरा.

स्थळ:—जंगल. पशुपती आणि बनराज प्रवेश करितात.

**पशु०**—दर्सन करतुया बनराज.

**बन०**—द्रसनं पस्पती.—लईग्वाड, लईग्वाड.—मितर गवसला

म्हूनश्यानी अक्शी आनंद होतुया. लईग्वाड लईग्वाड. ( एकमेकांना कडकडून भेटतात. ) कायर पस्पती, जंगलामंधी कशापाई आलास व्हय ?

**पशु०**—बनराज कशापाई आल्याती ?

**बन०**—मी कशापायीं आलों म्हनून काय पुसतोस ! ह्यो बनराज नव्हका ? मी बनांतच राहतुया. तवा बनराज बनांत कशापायीं बसला हाय, म्हनून इचारनारा तूं पसू नव्हस ?

**पशु०**—व्हय, व्हय, मी पसू हाय, आन तूबी जंगली हैस.

**बन०**—हांग मी जंगली हाय. मग इचारतुया ह्यो पसूंचा राजा श्येतकेतुमहाराजांचा शिकारखाना सोडूनश्यान हात कशापायीं आला ?

**पशु०**—मीबी अस इचारतुया, श्येतकेतुमहाराजांचा शिकारी जंगलावरचा ह्यो बनराज सरकारच पाय सोडूनश्यानी हात कशापायीं आला ?

**बन०**—तूं पसू हैस, आटुमुठा हैस, सरळ जाब न्हाई देनार, तवा असं करू या, तूं हात कशापयीं आलास ह्ये मी ह्यरतो आन मी हात कशापायीं आलो त्ये तूं ह्यर–उमगल ? न्हाई, न्हाई मी तुझा कावा ह्यरू ?–ह्यरू ?–आं–त्ये बग, त्ये बग, त्या आवाच्या पायीं तूं हात आला हैस व्हयना ?

[ **बुद्धिमती, वाग्मती, व करालमाया** येतात. ]

**करा०**—चल हो दूर, माझ्या माग येऊं नग, सटवी.

**पशु०**—आतां बनराजाचं इंगित ह्यरलं–लईब्येस–लईब्येस त्या फटाकड्या पोरीच्या पायीं बनराज बनांत गरगर पिंगा घालुतुया जनु !-करालमाये–ए करालमाये, हकड ये हकड.–ह्यो बनराज मला कसं म्हनतूया, तुझ्या इस्काच्या नादानं मी हात आलुया.

( वनराजास ) अरं ही आमची घरधनीन नव्हका? घरधननीचा इस्क कोनी करतुया का? इस्क कराया लग्नाबिगर दुसरी आवा लागतीया.–बनराज आपल ह्या बिंगीत खर व्हयना?

वाग्म०—काय मेले हे पुरुष चावट! आम्ही अशा जंगला-वनांत ह्यांच्या मागें लागून जर आलों नसतों, तर ह्यांनीं तरी आमची अशी थट्टा कां आरंभिली असती?–गडे बुद्धिमती, स्त्रीराज्यांतून पळूत जाऊन पुन्हा पुरुषराज्यांत जावें असें कांहीं मला आतां वाटत नाहीं. पुरुषराज्यांतले सगळे पुरुष जर असे हेंगाडे आणि चावट असतील, तर तेथें जाऊन करायचें तरी काय?

बुद्धि०—अग जरा थांब हो, अशी घाई करूं नकोस. पुरुषराज्यांत गेल्यावर तुला कधीं परत यावेंसें वाटणारच नाहीं.–करालमाये, तूं आपल्या घरधन्याला सांगून ह्या स्त्रीराज्यांतून आमची सुटका करीव.

करा०—तरी म्हटलं, आमच घरधनी माझ्या माग लागूनश्यानी लई बिगींबिगी धांवत कशापायीं इस्तरीराज्यांत आलं? हिला पळवून न्यायची होती नव्हका?

बुद्धि०—तसें नव्हे करालमाये.–हें पहा—

कराल०—चल हो दूर. लई लघळपणा करूं नग.–सटव्यांनो, माझ्या घराच उंबऱ्यांत पाऊल तरी ठेवा, अक्शी झिंझ्या धरूनश्यानी समद्या गांवांत धिंड काढीन. इस्तरीराज, इस्तरीराज, कसलं आलया इस्तरीराज! हात इस्तरीराज्यांत यायचं, नट्टापट्टा कराया शिकायचं,–म्वाड म्वाड बोलाया ठाव झालया सटव्यांना,–आन माझ्यासारख्या आयाबायांच्या दादल्यांना घरांतून बाहेर काढायच! काव घरधनी आतां बोलाना? कशापायीं इस्तरीराज्यांत आला? मी इस्तरीराज्यांत आलें, हात बाप्पे कोनबी न्हाई, मग माझी पा-

ळद राखूनश्यानी कशापाई आला व्हय? मी दुसरा म्होतूराचा दादला करीन, म्हनूनश्यानी आला व्हय?–इस्तरीराज्यांत पुरुष कुनीबी न्हाई. मग कशापायीं आला?–या अवदसेच्या पायीं आला व्हयना? कस म्हनत्यात, करालमायेच्या हाडाचा चूर होईल, म्हनूनश्यान बिजलीसारखा उतरलों आन घरधननीला लोन्याच्या गोल्यावानी झेलून धरली! या लोन्याच्या गोळ्यावर गिधाडाची नजर व्हती न्हवका?

**बन०**—का पस्पती, मी बरोबर ह्येरलं व्हयना? इचीभन इस्काला असीच नामी आवा लागती.

**पशु०**—जा राव, असा इस्कबिस्क करनारा ह्यो गडी नव्हे.

**करा०**—मंग हात माझ्या माग लागूनश्यानी कशापायीं आला?

**पशु०**—वरड, वरड, जोरजोरान वरड. तूं कितीबी बरडलीस म्हनूनश्यानीं मी इस्क थोडाच करतुया?– अग आमच्या शेजारच्या धैर्यमानाची बायकु बुद्धिमती नव्हका?–आतां कस ओळखलस?–हात येऊनश्यानी तिला सबुद ग्वाड उमटाया लागल हायती.–आता कस वळकलस?

**करा०**—पन ही दुसरी अवदसा हायना? ए सटवे, तूं कशापायीं आलीस? पुरुसराज्यांत तुझा कुनी दादला असला तर त्येच नांव घ्ये! आमच्या घरधन्याला फितवून न्यायला न्हाई येऊं द्येनार सांगतुया, सटवी.

**वाग्म०**—मी मेल्या पुरुषांशीं लग्नच लावायची नाहीं. माझा भाऊ आहे पुरुषराज्यांत त्याला भेटायला येते आहें हो.

**करा०**—आइकलका, सटवी कस म्हनतीया, हिला दादलाबिदला कोनबी न्हाई आन दादला करनारबी न्हाई.–बया तूं हातच इस्तरीराज्यांत बस. बिनदादलयाच्या आवा पुरुसराज्यांत मायं-

दल हैती; आन त्या बाजारबसव्यांनीं समद्या पुरुषासनी किड लावलीया.—बस. हातच बस. सटवी छबुकडी !

**वाग्म०**—गडे बुद्धिमति, माझी अशी थट्टा करण्याकरतां तूं मला येथें घेऊन आलीस होय?—माझें खेटर आडलें आहे, पुरुषराज्यांत यायला. महाराणीसाहेबांची छावणी सोडून आपण कांहीं अजून फार दूर आलों नाहीं. मी अशी परत जातें, आणि महाराणीसाहेबांना वर्दी देतें कीं हे दोन मेले धटिंगण पुरुष स्त्रीराज्यांत शिरले आहेत आणि बायकांना त्रास देताहेत. आपल्या स्त्रीराज्याच्या सैन्यानें सगळें जंगल वेढलें आहे, ह्यांतून हे मेले जिवंत बाहेर कसे पडतात, तें पहातें.

**बुद्धि०**—थांबहो वाग्मती.—आडमुठ्याशीं गांठ पडली म्हणजे थोडें वेडेवांकडें बोलणें सोसून घ्यावें लागतें !

**करा०**—परतुनश्यानी एक पाऊल तरी टाक सटवे, पुरुसराज्यांतल्या आवांचा तडाखा तुझ्या झिंज्यांना दावतें.

**पशु०**—करालमाये, तूं आपल्या घरधन्यास्नी घेऊनश्यानी जा.—ए बायांनो. हकड या, हकड बघा. तुमास्नी पुरुसराज्यांत यायच हाय व्हय? मी कोन ठाव हाय? श्येतकेतुमहाराजांच्या शिकारीजंगलाचा मी बनराज हाय. ह्या पुरुसराज्यांतल्या समद्या जंगलांत पांडवाचं सैन्य शिकार करूं लागलं हाय नव्हका? तवा समद वाघ, सिंह इस्तरी राज्यांत शिरत्याल, आन त्येच्या मागं लागूनश्यानी पांडवाचं रथी, महारथीबी हात येत्याल अशी श्येतकेतुमहाराजास्नी भिती पडली हाय. तवा श्येतकेतुमहाराजांची सवारी ह्या पहाडाच्या पल्याड छावणी देऊनश्यानी बसली हाय नव्ह का? आन पर्मिलाराणीच्या शिकारीचं कसं चाललं हाय, पांडवांच्या सेनेची हाणमार व्हती काय, संमदी खबर गुपीत गुपीत काढून ये म्हनूनश्यानी

महाराजांचा मला हुकूम झालाया. तवा म्हनतुया पर्मिलारानीची नीट खबर दिलीत, तर आईसाब, मासाब, रानीसाब, असं तुम्हांशी बोलूनश्यानी लई खुस करून पुरुसराज्यांत घेऊन जाईन.

**वाग्म०**—असें अदबीनें आमच्याशीं बोललास, अदबीनें वाग-लास. तर आम्ही येऊं तुझ्या बरोबर.

**बुद्धि०**—आणि प्रमिलाराणीची सगळी बातनी तुला सांगूं.

**करा०**—पस्पती, चल आपण जाऊं, लईब्येस झालया, लई-ब्येस झालया. ह्या बिनदादल्यांच्या आवांची घोरपड बनराजाच्या गळ्यांत पडली लईब्येस झालं. चल ब्येगी ब्येगी, ह्या संमद्यांच जर सुत जमल न्हाई, तर ती आवा महारानीसाबापाशीं जाऊन बोंब ठोकल आन तुझा माझा कडेलोट होईल. चल. चल.

[ करालमाया व पशुपती जातात. ]

**बन०**—आईसाब,-आमचं रानीसाब,—

**वाग्म०**—मला कारे मेल्या तुझी राणी म्हणतोस? कोणी पुरुषानें मला आपली राणी म्हणतां कामा नये. मला 'आईसाब' म्हणून हाक मार.

**बन०**—रानीसाब झाल्याविगार आईसाब कसं व्हायला होतया?

**वाग्म०**—नुसते बाईसाहेब म्हण.-ह्या हेंगाड्यांना आदबीनें बोलतांच येत नाहीं.-पुरुष जर मेले आमच्याशीं आदबीनें वागलें असते, तर आम्हीं स्त्रीराज्य कशाला स्थापलें असतें?

**बन०**—बाईसाब, आईसाब, ह्या जंगलामंदी कोनत्या टापूंत पर्मिलारानी शिकार खेळत्याती त्ये मला दावा; मग मी बी तुमास्नी पुरुसराज्यांत घेऊनश्यानी जाईन.

**बुद्धि०**—चल, असा आमच्या मागून ये, म्हणजे आपण महा-राणीसाहेबांच्या छावणीजवळ जाऊं. [ जातात. ]

---

# प्रवेश तिसरा.

—o:*:o:—

स्थळः—जंगल, सरस्वती नदीचा किनारा. **रूपमाया** व **पुष्पधन्वा** प्रवेश करितात.

पुष्प०—प्रिये. हा चमत्कार पाहिलास का? आम्ही इतक्याजवळ आलों, तरी संथपणानें स्वैर करावयाचें आपलें काम सोडून ह्या हरणांनीं अद्याप पळ काढला नाहीं! रूपमाये, माझें हें धनुष्य पाहिल्याबरोबर जंगलांतलें कोणतेंही श्वापद माझ्या बाणांच्या टप्प्यांत असतांना भीतीनें थरथर कांपल्यावांचून रहात नाहीं असा ह्या धनुष्याचा महिमा आहे.–बा हरणांनो, तुम्ही मला भीत नाहीं? माझ्या बाणांना भीत नाहीं? उलट माझ्याकडे प्रसन्न मुद्रेनें पहातां?–माझ्या धनुष्यानें आपला स्वभाव सोडला, माझ्या बाणांनीं आपला स्वभाव सोडला, शिकारीकरितां स्फुरण पावणाऱ्या पुष्पधन्व्याच्या ह्या बाहूंनींही आपला स्वभाव सोडला!—प्रिये, असें परतंत्र मला कोणी केलें? रूपमाये, वज्राहून कठोर म्हणून समजल्या गेलेल्या पुरुषजातीला कुसुमाहूनही मृदु करून सोडण्याचा हा प्रभाव कोणाचा सांग पाहूं?

रूप०—महाराज मी काय सांगूं?–पूर्वीं मी ह्याच वनांत शिकारीला येत असे. त्यावेळीं माझी शिकार या वृक्षाच्या आड लपलेली पाहून पुरुषवृक्षांनीं माझा अपमान केलासें वाटून ह्यांना तोडून टाकण्याकरितां मी त्यांच्यावर बाण सोडीत असे. माझ्या बाणांनीं हालून जाऊन हे वृक्ष पूर्वीं जेव्हां माझ्यावर फुलें गाळीत, तेव्हां बायकांशीं लगट करण्याचा ह्या मेल्यांचा चोंबडेपणा पाहून माझा मानभंग झालासें मला वाटे; व मीं कुसुमरेणूंना झिडकारून

देत असे. पण आज ह्या वृक्षांनीं मजवर कुसुमरेणू गाळावेत असें मला का वाटतें ?–बा वृक्षांनो, आमच्या ह्या प्रेमाच्या भेटीच्या वेळीं सुगंधी व कोमल फुलांच्या मंत्राक्षता आमच्या मस्तकांवर टाकून, आमचें पुढलें आयुष्य आनंदांत जावें, असा आम्हांला आशीर्वाद का देत नाहीं ? ( फुलें अंगावर पडतात. ) काय चमत्कार हा! पूर्वी माझ्या बाणांच्या तडाक्यानें इतका मोठा पुष्पवर्षाव होत नसे.–– बा वृक्षांनो, मीं तुमचीं प्रेमानें आर्जवें केलीं म्हणून का तुह्मी इतके खूष झालांत ?–महाराज, ज्या वृक्षांना पूर्वी मी बाणांनीं ताडण करीत असे, त्याच वृक्षांचीं आतां आर्जवें करण्याइतका माझा गर्व–माझा अहंकार–माझा मान नाहींसा झाला. हा कोणाचा प्रभाव बरें ? स्त्रीराज्यांतला माझा स्वभाव मीं विसरून जावें इतकें परतंत्र मला कोणीं बरें केलें ?

**पुष्प०**––प्रेमानें, गोड प्रेमानें.–ह्या प्रेमाच्या ठिकाणीं पुरुषांचें वर्चस्व पार नाहींसें होतें,––

**रूप०**––आणि बायकांचा गर्व विलयाला जातो.

**पुष्प०**––लाडके रूपमाये, हिमाचलांतल्या ह्या सरस्वतीच्या तीरावरील ही अपूर्व वनशोभा स्त्रीपुरुषांच्या प्रेमाच्या क्रीडेकरितां परमेश्वरानें उत्पन्न केली आहे, असें मला वाटतें. हा आकाशांतला प्रखर सूर्य वृक्षांच्या थंड व दाट छायेनें पृथ्वीवर जर कोणच्या स्थळीं चंद्राप्रमाणें कोमल व प्रेमवर्धक होत असेल, आणि चंद्रप्रभेसारख्या शीतल उजेडांत दिवसां विलास करण्याचें जर पृथ्वीवर कोणतें स्थान असेल, तर तें हेंच होय. देवादिकांची प्रख्यात विलासभूमि हीच आहे.–रूपमाये, योग्यांचा योगी, तपस्व्यांचा तपस्वी, ज्ञान्यांचा ज्ञानी, वृद्धांतला वृद्ध, विरक्तांतला विरक्त तो त्रिशूलपाणी शंकर ह्या ठिकाणीं जेव्हां आपल्या अर्धांगीवर रुसून तपश्चर्येकरतां प्राप्त

झाला, तेव्हां हिमाचलांतल्या ह्या विलासभूमीचा पगडा त्याच्या मनावर बसला; आणि दिव्य देहांत स्त्रीसंगाला राजी होण्याची त्या ज्ञानशीलाला लाज वाटल्यामुळें पशूचा देह ह्या ठिकाणीं त्यानें धारण केला. शंकराची जर अशी स्थिति झाली, तर तुझ्या सहवासांत या ठिकाणीं मी प्रेमांध होऊं नको तर काय होऊं?

( वारा सुटतो, लाटा उसळतात, हरणें उठून निघून जातात. )

**रूप०**—महाराज हा काय चमत्कार! हे वृक्ष शांतता सोडून जोरानें हलूं लागले, सरस्वतीच्या पाण्याच्या लाटा जोरानें उसळूं लागल्या, आणि हीं हरिणबालकें एकाएकीं उठून पार निघून गेलीं! महाराज, काय बरें कारण?

**पुष्प०**—सर्व सृष्टीला कह्यांत ठेवण्याचें सामर्थ्य प्रेमाच्या अंगीं आहे; मग ही सभोंवारची सृष्टि तुझ्या व माझ्या प्रेमाच्या वेळीं अशी खवळावी कां?--हें बरोबर आहे.–रूपमाये, लांब दूरवर तो चमत्कार पहा. शिकारीचा आवेश अंगीं चढल्यामुळें आपल्या तेजानें सूर्यालाही लाजविणारी प्रमिला वाघावर शरसंधान करीत इकडेच येते आहे, आणि वकील म्हणून आलेला अर्जुन प्रमिलेच्या रूपाचें कौतुक करीत तिच्या मागून येत आहे.–रूपमाये, आपण त्यांच्या दृष्टीस पडतां कामा नये, चल आपण एका बाजूला जाऊं.

**रूप०**—ज्या या भूमीनें शंकराच्याही मनाला प्रेमानंदाचा आस्वाद घ्यायला भाग पाडलें, ती ही देवादिकांची प्रख्यात विलास-भूमि प्रमिलेच्या मनांत अर्जुनमहाराजांचे विषयीं प्रेम उत्पन्न करो.

[ **रूपमाया** व **पुष्पधन्वा** जातात, वाघाच्या मागें लागलेली **प्रमिला** व **अर्जुन** प्रवेश करतात.

**प्रमि०**—माझ्या बाणांची पर्वा न करणारा वाघ मीं आजपर्यंत पाहिला नव्हता!–मला वाटतें ही जर वाघीण असती, तर एव्हांना

मरून दुःखांतून मुक्तच झाली असती. पुरुषांची जातच चिवट आणि मुरदाड !—वकीलसाहेब, ह्या वाघाची ह्यावेळीं काय अपूर्व शोभा दिसते आहे ! जबडा पसरून माझ्याकडे रागानें आणि त्वेषानें पाहणारे त्याचे इंगळासारखे लाल डोळे एकदम माझ्या अंगावर झाप घालायला त्याच्या क्रूर आणि उन्मत्त शरीराची उठावणी करतात न करतात तों त्याची चिडलेली नजर बाहेर आलेल्या जिभेंत रुतून बसलेल्या माझ्या बाणाकडे वळते, आणि मग भांबावून जाऊन हा शूर वाघ माझ्यापुढें लाजेनें मान खालीं घालूं लागतो !—वकीलसाहेब, माझ्या बाहुबलाच्या प्रभावानें पुरुषजातीचे डोळे दिपवून सोडून पांडवांना माझ्यापुढें लाजेनें अशी खालीं मान घालावयाला लावीन, असा माझा निरोप तुमच्या अर्जुनाला जाऊन कळवा.

**अर्जु०**—महाराणीसाहेब, आपल्या करामतीचें वर्णन मी काय करूं !—बा वाघा, धन्य तूं जगांत धन्य, म्हणून असल्या सुंदर हातांनीं सोडलेल्या बाणांचा स्पर्श तुझ्या शरीराला होत आहे.—सरकार, मला नाहीं वाटत आपल्याकडे हा रागानें आणि त्वेषानें पाहत आहे !

**प्रमि०**—पहा, कसा माझ्याकडे डोळे फाडफाडून टक लावून पाहतो आहे, आणि माझी व त्याची दृष्टादृष्ट झालीं, कीं त्यानें खालीं पाहिलेंच.—वाघाच्याही नजरेला नम्र करून पायाकडे वळविण्याचें सामर्थ्य स्त्रीराज्यांतल्या बायकांच्या अंगीं आहे, हें पाहून तुम्हाला आश्चर्य वाटत नाहींका?—जा, वाघा, जा. शेवटचा बाण सोडून तुझा जीव घ्यावा अशी माझी इच्छा नाहीं.—पण थांब, हा बाण सोडून तुझ्या जिभेंत रुतलेला पहिला बाण मला काढून टाकूं दे. ( तसें करते. ) काय, तुझ्या जिभेंत रुतलेला बाण मीं काढून टाकल्यामुळें, तुझ्या नजरेंतला सर्व क्रूरपणा पार नाहींसा

झाला ! जा, आपल्या गुहेकडे खुशाल जा. जातांना दीन नजरेनें माझ्याकडे पाहूं नकोस.—अरे तूं जातीचा पुरुष, वाघाच्या कुळांत तुझा जन्म, आणि अशा पोंचट आणि नेभळ्या नजरेनें माझ्याकडे पाहतोस?—जा, हो चालता.—वकीलसाहेब, मी पुरुषांचा पक्का द्वेष करितें, तरी शेळपट झालेल्या ह्या वाघाकडे माझ्यानें पाहवत नाहीं. मला जिवंत खाऊं कां गिळूं अशा भावनेनें माझ्याकडे क्रूर नजरेनें पाहणारा वाघ मला जसा आवडतो—पहा, पहा, जातां जातां लीन होऊन लुब्री दृष्टि त्यानें कशी फेकली !—वकीलसाहेब, तुह्मी पाहिलें नाहींत ?

अर्जु०—नाहीं, महाराणीसाहेब, मी त्या वाघाकडे पाहिलेंच नाहीं.

प्रमि०—कां ? ती तर पाहण्यासारखी मजा होती.

अर्जु०—पण त्या मजेहून अधिक सुंदर आणि मोहक अशी शोभा मी पाहत होतों !

प्रमि०—अशी कोणची ती शोभा ?

अर्जु०—महाराणीसाहेब, धनुष्य वांकवून त्या वाघावर आपण बाण सोडीत असतांना आपल्या भ्रुकुटीच्या धनुष्यांतून निराळाच बाण आपण माझ्यावर सोडला. आपला तो बाण वाघाच्या जिभेंत रुतून बसून त्यानें त्याला जसें घायाळ केलें, त्याप्रमाणें आपल्या नेत्रांतला बाणही माझ्या हृदयांत घर करून बसून त्यानें मला घायाळ केलें. आपण दयाळु अंतःकरणानें त्या वाघाच्या जिभेंत रुतून बसलेला बाण काढून टाकण्याकरतां धनुष्यावर दुसरा बाण चढवूं लागला; तेव्हां माझ्या हृदयांत रुतलेला बाण आपण प्रेमार्द्र दृष्टीनें काढून टाकाल, ह्मणून आपल्या भ्रुकुटीकडे मी मोठ्या आशेनें पाहत होतों. ती भ्रुकुटी वर चढली, तें धनुष्य सज्ज झालें, आणि आपल्या दृष्टीला माझी दृष्टि भिडली. त्यावेळीं वाघाच्या



प्रमि०—ह्या माझ्या बाणापासून आपलें प्रथम रक्षण कर, आणि नंतर माझ्याकडे पहावयाचें धाडस कर.

(पृ. ७७.)

जिभेंतला तेवढा बाण बाहेर पडला, पण माझ्या हृदयांत घुसलेला बाण अधिक अधिक खोल जाऊन मी पुरा घायाळ झालों; आणि वाघाची स्थिति काय झाली हें पाहण्याचें मला सामर्थ्यच राहिलें नाहीं.

**प्रमि०**—चोमड्या, मी अरण्यांत एकटी आहें असें पाहून असा लघळपणा करतोस का? प्रमिलेच्या दृष्टीला दृष्टि भिडविण्याची योग्यता कोणाची असूं शकते माहीत आहे?

**अर्जु०**—अनुरागाच्या नेत्राचा संगम प्रीतीच्या दृष्टीशीं होत असतो.

**प्रमि०**—चापधर प्रमिलेची नजर धनुर्धर महारथ्यांच्याच डोळ्यांशीं भिडत असते, आणि ती तरी केव्हां?

**अर्जु०**—केव्हां?

**प्रमि०**—लढाईला सज्ज होऊन माझ्यापुढें ठाकलेल्या अतिरथ्यांचे बाण मी मधल्यामधें तोडून टाकून, माझे बाण त्यांच्या छातीला भिडल्यानंतर, जेव्हां अतिरथी विस्मयानें माझ्याकडे पाहतात, तेव्हां त्यांच्याकडे तिरस्कारानें पाहण्याची मी मेहरबानी करतें; त्यावेळीं माझ्या नजरेंतील तुच्छता व अतिरथ्यांचा विस्मय यांचा संगम केव्हां केव्हां होत असतो!–तुला माझ्याकडे टक लावून पहावयाचें असेल, तर तो वाघ होता त्या ठिकाणीं जाऊन उभा रहा.–जा, तेथें उभा रहा.–जा, असा तेथेंच रहा.–ह्या माझ्या बाणापासून आपलें प्रथम रक्षण कर, आणि नंतर माझ्याकडे पहावयाचें धाडस कर.–घे, तूं आपलें धनुष्य घे.–काय धनुष्य घेत नाहींस? पुरुष असून भ्यालास? अरे, तो पशूच्या जन्माला आलेला नीच कोटींतला वाघ तुझ्यापेक्षां शतपटीनें बरा.–पुरुष असून असें भ्यावेंस? धिक्कार असो तुझ्या पुरुषत्वाला! अशा भ्याडानें प्रमिलेच्या नजरेशीं नजर भिडवण्याचें साहस करावें हं!..

अर्जु०—प्रमिले, मी भ्यालों नाहीं.—ह्या शिकारींत तुझ्या सौंदर्याची लीला पहावी ह्मणून चाप किंवा खड्ग कांहींच बरोबर न घेतां मी तुझ्या मागोमाग आलों. तुझ्या चेहऱ्याकडे टक लावून पहात राहणें एवढेंच ह्या शिकारींत माझ्याकडे काम आहे.—मी निःशस्त्र असलों तरी मनांत शंका घेऊं नकोस.—तुझ्या हातांतल्या धनुष्यापासून बाणांचा वर्षाव माझ्या छातीवर एकसारखा होऊं दे; आणि बाणांचा असा वर्षाव माझ्या वक्षस्थळावर होत असतांना, तुझ्या चेहऱ्याच्या सौंदर्याची लूट करण्याचें काम एक क्षणभर जर माझ्या ह्या डोळ्यांनीं सोडलें तर मग तूं मला भित्रा म्हण, मला भ्याड म्हण, पुरुषजातीला कलंक लावणारा म्हण.—माझ्या प्रेमाची तूं परीक्षाच पहा.—हा असा मी येथें उभा राहून प्रेमानें तुझ्याकडे एकसारखा पहात राहणार. नुसत्या टणत्कारानें ह्या जंगलांतल्या सर्व हिंस्र पशूंना भ्यावयाला लावणाऱ्या तुझ्या हातांतल्या धनुष्याच्या अंगीं तुझ्यावरील ही माझी दृष्टि फिरविण्याचें सामर्थ्य असेल तर त्याचा उपयोग करून पहा!

प्रमि०—निःशस्त्र पुरुषावर शस्त्र उगारणारी स्त्री स्त्रीराज्यांत सांपडावयाची नाहीं. तुमच्या हातांत धनुष्य नाहीं, तर मीही आपलें धनुष्य तुमच्यापुढें फेंकून देतें. रहा तुम्ही तेथेंच उभे रहा.—कोणी तरी स्त्रीसैनिक भेटून दुसरें धनुष्य आपल्याला मिळून आपण युद्धाला सुरुवात करीपर्यंत तुमच्यासारख्या निर्लज्जांनीं असें टक लावून पाहिलें तरी स्त्रीराज्यांतल्या बायकांचीं मनें चंचल होत नाहींत, हें मी तुमच्या अनुभवाला आणून देतें.—पुरुषांचा निर्लज्जपणा धनुष्यबाणांनीं ताळ्यावर आणावा लागतो, किंवा निर्भर्त्सना करून पुरुषांचें मन खट्टू आणि फजित करून त्यांना शुद्धीवर आणावें लागतें.—कायरे ए मूर्खा, तुझ्या पोटांत कोणच्या प्रेमाचें विष

भरलें आहे तें ओक पाहूं. ह्या हिमाचलाप्रमाणें थंड निश्चल, व निर्विकार तुझ्यापुढें अशी उभी राहून मी तुला फजित करतें. ( पडद्यांत "सावध असा, सर्व शिकारी हो, सावध असा. आपला नवरा घायाळ झालेला पाहून चवताळलेली ही वाघीण, दहापांच स्त्रीसैनिकांना दुखापत करून, सर्वांवर अवचित् झडप घालीत आहे, सावध असा, सावध असा." )

**प्रमि०**—अहो वकीलसाहेब, तेथून दूर व्हा, इकडे या. ती पहा वाघीण आपल्याच बाजूला उड्या मारीत येत आहे. तुम्ही जरा दूर व्हा. धनुष्यबाण हातीं घेऊन मी तुमचें रक्षण—हां माझ्या धनुष्यावर पाय ठेऊं नका. ह्या वाघिणीपासून रक्षण करण्याकरतां—( **अर्जुन प्रमिलेचें** धनुष्य पायाखालीं तुडवितो. ) मेल्या, धनुष्यावरचा पाय काढ.—धनुष्यावर बाण चढवून वाघिणीला मी प्रथम मारतें, मग माझें धनुष्य पायाखालीं तुडवून माझा अपमान केल्याबद्दल—

**अर्जु०**—प्रमिले, तुझें हें धनुष्य मी असें पायाखालीं तुडवितों.

**प्रमि०**—माझ्या धनुष्यावरचा पाय काढ; त्या वाघिणीपासून मला तुझें प्रथम रक्षण करूं दे.—ती पहा—ती जवळ येत चालली.

**अर्जु०**—वाघवाघिणींपासून आपलें रक्षण करून घ्यायला प्रमिले धनुष्यबाण कशाला?—एक वाघीण येवो, हजारो वाघिणी येवोत, किंवा प्रत्यक्ष कृतांतकाळ अस्मानांतून एकदम माझ्या मस्तकावर पडो, प्रमिले, तूं जोंपर्यंत माझ्या दृष्टीसमोर आहेस, तोंपर्यंत ही माझी दृष्टि तुझ्या चेहऱ्यावरून हलावयाची नाहीं.

**प्रमि०**—मी तुझाला असे बाजूला सारून धनुष्य घेऊन—

[ धनुष्यावरून **अर्जुनाला** बाजूला ढकलूं लागते. ]

**अर्जु०**—प्रमिले, मी तुझ्या धनुष्यावर पाय देऊन उभा राहिलों असतां मला बाजूला सारण्याचें सामर्थ्य तुझ्या अंगीं नाहीं.

तुझे दोनही हात असे पकडून तुला माझ्या ह्या प्रेमाच्या दृष्टीपुढें अशी उभी करतों.　　　[ हात धरून उभी करतो. ]

**प्रमि०**—माझे हात सोडा. त्या वाघिणीपासून तुमचें रक्षण करायला मला—

**अर्जु०**—वाघिणीपासून रक्षण करायला तुझ्या हाताची किंवा ह्या धनुष्याची जरूरी नाहीं. तुझें धनुष्य असें पायाखालीं तुडवून-हें पहा-तुझ्या धनुष्याचे दोन तुकडे झाले.

**प्रमि०**—अहो वाघीण झाप टाकणार आतां—

**अर्जु०**—ज्या माझ्या हातांनीं स्त्रीराज्याच्या ह्या सिंहिणीला अशी ललिनें धरून ताब्यांत ठेविली आहे, ते माझे हात त्या वाघिणीला भितात काय ? [ **वाघीण अर्जुनावर** उडी टाकते. एका हातानें तिचा गळा धरून दुसऱ्या हातानें तिचे पंजे पकडून **प्रमिलेकडे** पहात **अर्जुन** उभा राहतो. ]

**प्रमि०**—[ स्वगत ] काय विलक्षण यांचें हें धैर्य, केवढी ही अपूर्वशक्ति, आणि अशा स्थितींत देखील माझ्याकडे प्रेमानें पाहत आहेत !—ह्यांच्याकडेच एकसारखे पहावेंसें मला कां वाटूं लागलें?

**अर्जु०**—प्रमिले, तुझ्या बाणांनीं तो वाघ घायाळ झाला, पण जिवंत निसटून गेला; माझ्या मनगटाच्या शक्तींतून निसटून जाण्याची ह्या वाघिणीची प्राज्ञा नाहीं.—क्रूर वये, प्रमिलेनें जर प्रेमाच्या नजरेच्या इषाऱ्यानें तुला जिवंत सोडायचा हुकूम मला केला —प्रमिला माझ्याकडे विस्मयानें व प्रेमानें पाहते आहे, जा, वये, तूं आलीस त्या पावलीं परत जा. स्त्रीजातीची आहेस; तुला सर्व क्रूरपणा माफ आहे. जा,　　　[ वाघीण जाते. ]

**प्रमि०**—[ स्वगत ] त्या मनगटांना स्पर्श पुन्हा करावा असें मला कां बरें वाटतें? प्रामिले, वारंवार शौर्याच्या मूर्तीकडे पहात



प्रमि०—ह्यांच्याकडेच एकसारखें पहावेंसें मला कां वाटूं लागलें ? ( पृ० ८०. )

राहूं नकोस.–माझा अहंकार, माझा गर्व, नाहींसा होत चालला का? नको, प्रमिले तूं त्यांच्याकडे पाहूं नकोस.

अर्जु०—प्रमिले, तुझ्या धनुष्यापेक्षां माझ्या मनगटांत जरी अधिक शक्ति असली तरी तुझ्या भिवयांच्या धनुष्याचा प्रताप माझ्या मनगटाच्या शक्तीहून अधिक आहे.–तुझ्या धनुष्याचे मी दोन तुकडे जरी केले तरी तुझ्या नेत्रांतल्या बाणांनीं मी तुझा बंदा गुलाम झालों आहें.

प्रमि०—( स्वगत ) हे काय भलते भलते विचार या वेळीं माझ्या मनांत एकाएकीं उद्भवूं लागले! अगबाई हे माझ्याकडे पहात जवळ येत चालले! प्रमिले, येथून तूं पाय काढ नाहातर– हे स्वतः अर्जुनमहाराज तर नसतीलना? मी पांडवांचा वकील आहें, असें त्यांनीं माझी परीक्षा पाहण्याकरतां सांगितलें नसलना?–चाललें मन फार बहकत चालल!–नकोत ह विचार.–हे जवळ असल्यावर चलबिचल होऊन मनाला नाहीं शांति मिळायची.–ह्यांची टाळा-टाळी करून मला गुरुमहाराज सत्यसाय माईचे पाय गाठले पाहि-जेत.–असेंच करणार; ह्यांचें दर्शनच नको [ जाते. ]

अर्जु०—अरे ही एकाएकी निघून गेली! ही शिकार माझ्या हातीं लागणार असें चिन्हही दिसूं लागलें आहे. तिच्या चेहऱ्यावर आतां निराळे विकार खेळूं लागले आहेत. त्या वाघिणीला मी तशी जाऊं दिली, पण स्त्रीराज्याच्या ह्या सिंहिणीची शिकार केल्यावांचून हा अर्जुन राहणार नाहीं. [ जातो,–पडदा पडतो. ]

## अंक तिसरा समाप्त.

---

# अंक चवथा.

## प्रवेश पहिला.

—०※०—

**मैत्रे०**—( स्वगत ) ह्या दिग्विजयांत झालेल्या माझ्या अप्रतिष्ठेचा वचपा स्त्रीराज्यांत काढायला सांपडेल, ह्या आशेनें मी स्त्रीराज्यांत आलों; कांहीं पराक्रम करून दाखवावा म्हणून हें धनुष्य मागून घेतलें; पण याचा मला कांहीं उपयोग होत नाहीं. उलट माझ्या मानेवर हें एक जड जूं मात्र झालें आहे. खुंटीला धनुष्य अडकवावें, त्याप्रमाणें शिकारींत माझ्या गळ्यांत अर्जुनमहाराजांनीं हें पुन्हा अडकवलें आहे!—दुसरा एकादा मैत्रेय असता तर या धनुष्याच्या भाराखालीं चिरडून जाऊन रावणाप्रमाणें उताणा पडून रक्त ओकून मेला असता. पण मी पडलों वस्ताद, ह्या जंगलांत धनुष्याचें जूं आपल्या मानेवरचें हालत नाहीं असें पाहून, ह्या फराळाची चौकी सोडून मी बाहेर कोठेंच गेलों नाहीं.—ह्या धनुष्याचा उपयोग करून शिकार करण्याचे नादीं न लागतां ( गळ्यांतून धनुष्य काढून ठेवतो. ) ह्या चौकींत बसून फराळाच्या कोठींत शिरून लाडवाकरंज्यांची अशी ( फराळाचें खातो. ) शिकार करीत वेळ काढतों आहे.—अरे वा! ही कोणाची स्वारी? रूपमायेला ह्यांनीं वश करून घेतलें वाटतें!

( **मैत्रेय** तसाच बसून रहतो, **रूपमाया** व **पुष्पधन्वा** बोलत बोलत चौकीजवळ येतात. )

पुष्प०—प्रिये रूपमाये, ह्या जगलांत तुझ्या सहवासांत आमचे हे दोन दिवस कसे निघून गेले याचें मला मानही नाहीं !–खायला प्यायला छावणीकडे यायची इच्छाही झाली नाहीं !

रूप०—प्रेमांत माणूस गुंगलें असलें म्हणजे त्याची भूक हरपते तहान नाहींशी होते, आणि आपण जागे आहोंत कां निजलों आहोंत ह्याची देखील शुद्धि रहात नाहीं.

पुष्प०—प्रेमी आणि तपस्वी ह्यांमध्यें काय भेद आहे?–प्रेमाच्या माणसाच्या सहवासाकरितां प्रेमी कंदमूलावर किंवा निरशनावर पाहिजे तितक्या दिवस गुजारा करतो.

रूप०—तपस्व्याप्रमाणें जंगलांतल्या झऱ्यांच्या स्वच्छ पाण्यावर संतुष्ट होऊन दोन दोन दिवसांत प्रेमीजनांना दुसऱ्या कशाचें स्मरणही होत नाहीं.

पुष्प०—तपस्व्यांना पर्णकुटिका तरी लागते; पण आम्ही हे दिवस सरस्वतीच्या शांत व थंड ओघांत जलक्रीडा करण्यांत किंवा लतांच्या सावलीखालीं बसून प्रेमाच्या गोष्टी गुणगुणण्यांत घालवले!

रूप०—आणि गाढ प्रेमालिंगनांत मग्न होऊन वृक्षाखालीं कोठें आमच्या रात्री गेल्या याची आम्हांला आठवणही नाहीं !

पुष्प०—इष्ट देवतेचें ध्यान करीत असतांना तपस्वी ज्याप्रमाणें सभोंवारच्या जगाला विसरून जातो, त्याप्रमाणें शिकारी प्रमिलामहाराणी किंवा अर्जुनमहाराज ह्या सर्वांना आम्ही विसरून गेलों.–रूपमाये, तुझ्याशिवाय जगांत मला दुसरें कांहीं दिसत नाहीं.

मैत्रे०—पण मला सरकार दिसतातना?–मी तपस्वी आहें, प्रेमी नाहीं. प्रेम आंधळें असतें, तपश्चर्या डोळशी असते. एवढाच प्रेमी आणि तपस्वी ह्यांमध्यें भेद आहे, सरकार.

पुष्प०—मित्रा मैत्रेया, तूं आलास म्हणून बरें झालें, नाहींतर प्रेमाच्या धुंदींतून आम्ही जागेच झालों नसतों.

मैत्रे०—अजून तरी नीट जागे झालांत का? अहो महाराज, मी नाहीं तुमच्याकडे आलों, तुम्हीच माझ्याकडे आलांत.

रूप०—खरेंच महाराज, प्रमिलामहाराणीला चुकविण्याकरतां कांव लांब कोठें तरी भटकत असतांना, कोणच्याच गोष्टीची शुद्धि न राहून आम्ही नेमके ह्या चौकाकडे आलों! -महाराणीसाहेबांची स्वारी इतक्यांत येथें यायची नाहींना?

मैत्रे०—आतां येथें स्त्रीराज्यांतली एक देखील बाई फिरकायची नाहीं. मीं त्याचा पक्का बंदोबस्त केला आहे.

पुष्प०—कसा काय बंदोबस्त केला आहेस?

मैत्रे०—ह्या चौकींतल्या फराळाच्या कोठीवर बुद्धिमती, वाग्मती, यांसारख्या बायांची योजना झाली होती. त्या पुरुषराज्यांत पळून गेल्या; आणि बायकांची फळी फोडण्याचें श्रेय पुष्पधन्वामहाराजांना न मिळतां एका भिल्लाला मिळालें!

पुष्प०—गळ्यांत धनुष्य अडकवून आपण कोणची कामगिरी वजावली, तें अगोदर सांगा.

मैत्रे०—मी होय? ह्या चौकीचें दार केलें बंद, आणि नाक धरून सरस्वतीच्या कांठीं बसलों स्नानसंध्या करीत. भुकेनें व्याकूळ झालेली बाई आली कीं, लावली तिला धुडकावून; जा दोन योजनें उत्तरेला महाराणीसाहेबांनीं तळ हालविला आहे, तेथें इथली कोठी नेली आहे. असें करून आतांपर्यंत पुरुषांशिवाय बायकांच्या पोटांत फराळाचा एक कणही जाऊं दिला नाहीं.—अशा रीतीनें स्त्रीराज्यांतल्या सगळ्या स्त्रीसेनेला उपासमार घालून वठणीला आणून

स्त्रीराज्य जिंकण्याचें अर्जुनमहाराजांचें काम मीं सोपें केलें आहे. हें धनुष्य गळ्यांत अडकवल्यापसून सेनापतींच्या युक्त्या व डावपेच मला आपोआप सुचूं लागले आहेत, असें नाहीं तुम्हाला वाटत ?

रूप०—शत्रूच्या सैन्याची अन्नसामुग्री लुटण्याकरतां लहान लहान तुकड्या पाठवतात; तसें ह्या जंगलामध्यें बायकांचा उपा-समार करण्याकरतां ह्या मेल्या खादाडांची योजना इकडून झाली होती वाटतं !

पुष्प०—स्त्रीराज्य मोडण्याकरितां आम्ही स्त्रीराज्यांत आलों; ह्याचा सूड उगविण्याकरतां तुम्ही सर्व बायका असें करा, पुरुषराज्य मोडण्याकरतां पुरुषराज्यांत चला, म्हणजे झालें.—मैत्रेया, आम्ही दोन दिवस एकसारखे हिंडतों आहों, रूपमायेला थकवा वाटत असेल; तर आतां आपण सर्वजण या चौकींत विश्रांति घेऊं.

( **रूपमया, पुष्पधन्वा, मैत्रेय** चौकींत बसतात. **प्रमिला** प्रवेश करते. )

प्रमि०—( स्वगत ) तो खरोखर राजपुत्र असावा असा मला का संशय येतो?—मनाला जसं आवडतें तसेंच खरोखर आहे, असं भासवण्याची हातोटी आशेला चांगली साधते.—प्रमिले, तो राजपुत्र असला, खुद्द अर्जुन असला, तरी तुला काय करायचें? या प्रमिलेचें लग्न होणार आणि स्त्रीराज्य मोडणार असें ऐकल्यावर गुरु-महाराज सत्यमायामाई मला शाप देणार नाहींत कां ? माझ्याकरतां ज्या रूपमायेनें पुष्पधन्व्यासारख्या राजपुत्राला झिडकारलें त्या रूप-मायेला, अर्जुनाला वरून वीरपत्नींचीं सुखें भोगूं पाहणाऱ्या ह्या प्रमिलेनें कसं तोंड दाखवावें? आपले बाप, आपले भाऊ, आपले नवरे ह्या सर्व पुरुषांना सोडून स्त्रीराज्य स्थापण्याच्या ईर्षेनें बुद्धि-मतीवाग्मतीसारख्या ज्या तरुण मुलींनीं स्त्रीराज्याची सेवाचाकरी

पतकरून हातांत तरवार धरली, त्या माझ्या सेनेंतल्या शूर वीर बाया, लग्नाचे सोहाळे उपभोगायला प्रमिला तयार झाली तर, कुद्ध झालेल्या वाघिणीप्रमाणें मला पकडून चावून खाणार नाहींत कां ? पण क्रुद्ध झालेल्या सर्व वाघिणींना सहज लीलेनें आवरून धरण्याचें सामर्थ्य तिकडच्या अंगांत आहे ! ( **बुद्धिमती, वाग्मती** व **वनराज** येतात. ) ह्या कोण ? बुद्धिमती, वाग्मती !—स्त्रीराज्याविरुद्ध खुद्द प्रमिला बंड करूं लागली आहे, असे समाधात पाहून सत्यमायामाईंनें मला धरण्याकरितां त्यांना पाठविलें नाहींना ?—काय मी भ्यालें ! चोरट्या पापामुळें मन जितकें भित्रें होतें तितकें भित्रें दुसऱ्या कशानें होत नाहीं.—प्रमिले, तूं स्त्रीराज्याची धीट महाराणी आहेस-पण ह्यांच्या बरोबर हा पुरुष कोण ? माझ्या राज्यांत मला न कळतां पुरुषांचा प्रवेश !—चांडाळांनो, अद्याप प्रमिलेचें लग्न लागलेलें नाहीं, अद्याप प्रमिला स्वतंत्र आहे.-हा मेला ह्यांच्याशीं काय बोलतो तें येथें झाडाच्या आड उभें राहून नीट ऐकलें पाहिजे. [ आड उभा राहते. ]

**बुद्धि०**—वनराज, ह्या चौकीच्या पलीकडे जवळच गुहेंत गुरुमहाराज तपश्चर्येला बसल्या आहेत, आज त्या तपश्चर्येंतून उठायच्या आहेत. तेव्हां प्रमिलामहाराणीसाहेब आज येथें आल्यावांचून राहायच्या नाहींत.

**वाग्म०**—तुला आम्हीं महाराणीसाहेबांची सर्व बातमी सांगितली. आतां तूं मात्र आम्हाला स्त्रीराज्यांतून बाहेर काढून नेलें पाहिजेस. आम्हीं आमच्या इमानाला जागलों. तूं आपल्या इमानाला जाग.

**बुद्धि०**—पुरुष बेइमानी नसतात.

**प्रमि०**—( पुढें येऊन ) बायका बेइमानी असतात.—का भींतीनें चपापून अशा मागें कां सरतां? पुरुषराज्यांत तुम्हाला पळवून नेण्याकरितां हा धटिंगण इथें आला आहे नव्हे? कोण हा तुमचा?—बोला, बोला.—माझ्या स्त्रीसेनेंत फितुरी करणारा हा चांडाळ कोण?

**वाग्म०**—महाराणीसाहेब, हा एक तरुण पुरुष आहे.

**प्रमि०**—तरुण पुरुष आहे! मला हें समजतं हो! कोणाही पुरुषाच्या नादीं लागून पुरुषांची चाकरी करणार नाहीं, अशा माझ्या पायावर हात मारून घेतलेल्या शपथा तुम्ही विसरला वाटतं! बेइमान बायकांची जात!—तरुण पुरुष आहे, जसें कांहीं मला समजतच नाहीं.—हा कोण तुझा?

**वाग्म०**—माझ्याशीं हा आदबीनें बोलतो, लवून नम्रपणानें हा माझ्यापुढें हात जोडतो, मला काय आवडत काय नाहीं ह्याची चौकशी करून मला खुष करायला हा तयार असतो, आणि मी करीन ते हुकूम हा ऐकतो.—काल-परवा—हा माझा कोणी नव्हता; पण आज हा माझा चाकर झाला आहे, आणि मी त्याची मालकीण झाले आहें.

**बुद्धि०**—मेल्या पुरुषाचें तोंड चुकवून त्यांच्यापासून दूरदूर पळून जाऊन स्वतःला ह्या चार पहाडाच्या भिंतींत कोंडून घेण्यापेक्षां पुरुषराज्यांत शिरून पुरुषांना आमचे गुलाम केल्यानें आमची शपथ अधिक चांगली पाळली जाईल. असें आम्हाला वाटलें, म्हणून ह्याचा हात धरून, मला सोबतीला घेऊन, वाग्मती अशी निघून जात आहे. ( **वाग्मती, बुद्धिमती, वनराज** निघून जातात. )

**प्रमि०**—माझा असा उघड अपमान करून ह्या निघून गेल्या!—ह्या फितुरीबद्दल शिक्षा करावी, शिंगें फुंकून स्त्रीसेना गोळा

करून ह्यांना अटकेंत ठेवावें, असें ह्या प्रमिलेला का वाटत नाहीं?–प्रमिले, सर्व स्त्रीसैन्य असेंच बिघडलें असेल, अशी का तुला भीति वाटते?–सैन्य बिघडलें नसलें तरी ह्या प्रमिलेचें मन कोठें बिघडल्याशिवाय राहिलें आहे?–फितूर होऊन पुरुषांना जाऊन मिळालेल्या ह्या बायांना दटावण्यासाठीं स्त्रीराज्याच्या अभिमानानें शरिरांत रागाचा आवेश भरावा, आणि वाघिणीला थोपवून धरणाऱ्या त्या अद्‌भुत शक्तीच्या मनगटाचें चित्र माझ्या फसव्या मनानें माझ्या डोळ्यापुढें एकाएकीं उभें करून माझा राग जागच्याजागीं थिजवून टाकावा, अशी माझी स्थिति झाली आहे!–गुरुमहाराज, काय करूं आणि कसें करूं असें होऊन गलितधैर्य झालेल्या ह्या शिष्यिणीला ह्या चौकींत स्तब्ध व मंद बसलेली पाहिल्यावर पुरुषांविषयींचा माझा तिरस्कार व माझा द्वेष पुन्हा चेतेल असा मला उपदेश करा. अभिमान चेतविणाऱ्या त्या आपल्या उपदेशामृताचें सिंचन माझ्या भ्रष्ट मनावर होऊन प्रमिलेचे पूर्वींचे मनोविकार पुन्हा सजीव होऊं देत.–गुरुमहाराज येईपर्यंत ह्या चौकींत मला आतांचा थोडा वेळ कसाबसा कंठला पाहिजे. ( चौकी जवळ जाते. चौकीचा दरवाजा बंद पाहून दरवाजा ठोठावीत ) अग कोणी चौकींत आहां का? कोणी आहां काग?–ओ तर कोणी देत नाहीं आणि दरवाजा तर आंतून बंद आहे! कोणी आहां का? दरवाजा उघडा.–समजत नाहीं सटव्यांनो मी प्रमिलामहाराणी आहे.–उघड दरवाजा मुकाट्यानें.

**मैत्रे०**—(आंतून आंत कोणी नाहीं. उगीच दरवाजा ठोठावूं नका.

**प्रमि०**—मेल्यांनो, आंत कोणी नाहींका? मघाशी एकीचें बोलणें निमूट ऐकून घेतलें म्हणून दुसरी असा माझा उपमर्द करूं लागली!–उघड सटवे मुकाट्यानें दार.

**मैत्रे०**—( आंतून ) सगळें फराळाचें संपलें आहे. येथें आंत कोणी नाहीं.

**प्रमि०**—अग सटव्यांनो, जिवंत बोलत आहां, आणि आंत कोणी नाहीं म्हणून मला सांगत आहां का? असें दार फोडून—

[ दार जोरानें ठोठावते, **मैत्रय** बाहेर येतो. ]

**मैत्रे०**—आंत कोणी नाहीं.

**प्रमि०**—कोणी नाहीं तर तूं रे कोण मेल्या?

**मैत्रे०**—मी पुरुष आहें.—स्त्रीराज्यांत पुरुष म्हणजे असून नसून सारखेच, असले तरी नसल्यासारखेच; म्हणून आंत कोणी नाहीं अशी सरकारला विनंति केली.

**प्रमि०**—आणि तो लुगड्याचा पदर दिसतो आहे तो कोणाचा? ए सटवे, चल ये अशी बाहेर.—मी तुला सांगतें आहें, प्रमिला महाराणीचा तुला हुकूम आहे, माझ्या हुकुमाचा असा अपमान!—ह्या सटवीचें नाक कांपून धिंड काढली पाहिजे

[ **रूपमाया व पुष्पधन्वा** हातांत हात घालून बाहेर येतात. **प्रमिला** चकित होऊन उभी राहते. **रूपमाया व पुष्पधन्वा** तिच्या जवळ जातात. **मैत्रय** पळून जातो. ]

**पुष्प०**—पांडवांच्या लष्कराचा सेनापति हा पुष्पधन्वा आपल्या अर्धांगीसह स्त्रीराज्याच्या प्रमिलामहाराणीसाहेबांना प्रणाम करीत आहे. [ **रूपमाया व पुष्पधन्वा** प्रणाम करतात ]

**रूप०**—( प्रमिलेच्या पुढें गुडघे टेंकून ) महाराणीसाहेब, आपल्या नेत्रांतून खालीं पडणारे हे अश्रु दुःखाचे नाहींतना? आपल्या ह्या धाकट्या बहिणीचा अपराध पोटांत घालून, स्त्रीराज्याच्या उत्कर्षीसंबंधानें नाहीं तरी इतर गोष्टीसंबंधानें, माझ्याशीं प्रेमानें वागण्या इतकें सरकारचें अंतःकरण दयाळु नाहीं का?

**प्रमि०**—रूपमाये, ऊठ, ऊठ.—तुझें कल्याण चिंतूं का काय करूं हेंच मला समजत नाहीं.—ऊठ, ऊठ.—माझ्या तोंडून शब्दच निघत नाहीं. माझ्या पायाखालची ही पृथ्वी दुभंगते आहेसें मला वाटतें आणि सभोंवारची ही जड सृष्टि विरघळून ह्या आकाशांत मिसळून जाते आहेसें मला दिसतें !—रूपमाये, लहानपणीं तूं आणि मी एके जागीं खेळलें, सत्यमायामाईपाशीं लडिवाळपणानें नानाप्रकारच्या विद्या शिकलों, आणि तरुणपणीं एकाच मताच्या व एकाच विचाराच्या असल्यामुळें तूं आणि मी दोघीजणींनीं मिळून हें स्त्रीराज्य स्थापलें.—रूपमाये, तुला योग्य असा पति मिळाला, मला समाधान आहे. पण स्त्रीराज्याच्या अभिमानामुळें माझ्या मनाला यावेळीं कष्ट होत आहेत; आणि रूपमायेनें—माझ्या लहानपणच्या खेळगडीनें—माझ्या तरुणपणच्या मैत्रिणीनें—माझ्या आर्ध्या शरीरानें—माझ्या आर्ध्या मनानें—माझ्या आर्ध्या जिवानें—

**रूप०**—प्रेमाच्या सत्तेमुळें—

**प्रमि०**—दुसऱ्या आर्ध्या जिवाला एका शब्दानेंही कळूं न देतां पुरुषांचा सहवास पतकरला म्हणून माझा अभिमान ह्या माझ्या डोळ्यांतून अश्रुरूपानें गळतो आहे.—पूर्वींच्या एकएक गोष्टी आठवल्या—जा—

**रूप०**—प्रेमपाशांत मी सांपडलें खरी—पण—

**प्रमि०**—जा, एकमेकींना आम्ही दिलेलीं वचनें ध्यानांत आणलीं,—तूं नाइलाज होऊनच हें असें केलें असशील—जा—

**रूप०**—माझ्यावर असें न रागावतां—

**प्रमि०**—माझ्या हातून अविचार होईल.—जा मला कांहीं वेळ एकटीलाच ह्या सर्व गोष्टींचा विचार करूं दे.



प्रमि०—माझ्या हातून अविचार होईल.–जा–मला कांहीं वेळ एकटीलाच ह्या सर्व गोष्टींचा विचार करूं दे. (पृ.९०)

**रूप०**—असें मनाला वाईट वाटून घेऊं नका.

**प्रमि०**—नको, काकुळतीच्या मुद्रेनें माझ्याकडे पाहूं नकोस.—प्रमिलेनें दुःखी होऊं नये—

**रूप०**—प्रेमाच्या सुखाला का मुकतां?

**प्रमि०**—प्रमिलेनें कष्टी होऊं नये,—

**रूप०**— अभिमानाचे हे कष्ट थोड्या विचारानें फेंकून देतां येतात.

**प्रमि०**—प्रमिलेचा अभिमान नाहींसा होतांना असह्य यातना प्रमिलेच्या जिवाला होऊं नयेत,—

**रूप०**— आपणास यातना व्हाव्यात, असें मला कसें बरें वाटेल

**प्रमि०**—अशी जर रूपमाये, तुझी इच्छा असेल, तर स्त्रीराज्याची स्त्रीसेना पुरुषांच्या फंदांत सांपडून नष्ट झाला म्हणून मला तोंडावर बजावणाऱ्या तुझ्या ह्या पतीला कांहीं वेळ माझ्या दृष्टीआड कर. जा-जा-इथून निघून जा.

[ **रूपमाया, पुष्पधन्वा** जातात. ]

**प्रमि०**—( स्वगत ) मनांतल्या मनोराज्यासारखी दोन दिवसांत माझ्या स्त्रीराज्याची वाताहात व्हावी ना? पार्वतीमाईनें स्त्रीराज्य स्थापिलें, पुरुषांपैकीं हजारो वीरांना धूळ चारली, पण अखेरीस स्त्रीजात चंचल मनाची असते असा आम्हां बायकांच्या नांवाचा बभ्रा व्हावा म्हणून एका जोग्याच्या नादीं लागून ती फसली!- रूपमाये, तूं एवढें तरी बरें केलेंस, तुझ्या रूपाला, तुझ्या शौर्याला, तुझ्या सद्गुणाला साजेलसा पुरुष पाहून त्याच्या हातून तूं आपल्या प्रतिज्ञेचा भंग करून घेतलास.- त्या बिचाऱ्या वाग्मतीला तिची मर्जी पाहून गुलामाप्रमाणें वागणारा पुरुष मिळाला; पण रूपमाये, तुझा पती तुझ्या म्हटल्याप्रमाणेंच वागेल अशी तुझी खात्री आहे का? बायकांपासून

ह्या पुरुषजातीला जोंपर्यंत सुख होत असतें, तोंपर्यंत हे बायकांचीं आर्जवें करतात; पण रूपमाये, आजचा हा सुखाचा दिवस निघून गेल्यावर तुला बटकीप्रमाणें तो उद्या वागवूं लागेल, याची वाट काय? गुरुमहाराज म्हणतात त्याप्रमाणें हे मेले पुरुष आपमतलबी असून बायकांकरतां स्वतःच्या सुखांत तिळभरही कमी पडलेलें ह्यांना खपायचें नाहीं.—पुरुष जर स्वार्थसाधु नसते, तर, तर,—काय? नाहीं, नाहीं; रूपमायेप्रमाणें मीही माझें बदनाम करून घेणार नाहीं. [ जाते. ]

---

# प्रवेश दुसरा.

—०:❀:०—

**स्थळ**—जंगल. **जंगली** गांजाची चिलीम हातांत घेऊन प्रवेश करतो.

**जंग०**—[ गांजा मळून भरून काडी लावून विस्तवाशिवाय ओढून ] आं इचभन ह्या गांजाचा अंमलबी चढत नाहीं.—त्येकान हिरवा पाचोळा देऊनश्यानी फसवल नव्ह का? [ पुन्हा चिलीम ओढून ] कायबी न्हाई !—गांजाचा अंमल दारुवानी बायकी नव्ह.—गांजा मर्द हाय मर्द.—घोड्याच्या रिकिबींत यक पाऊल ठेवूनश्यानी दम मारावा आन दुसरा पाय रिकिबींत जातुया न जातुया तोंच चढला अंमलाच्या घोड्यावर. ( दम मारून ) काय बी न्हाई—कायबी न्हाई ! काश्र मर्दा, असा न्येभळा कशापायीं झाला हैस ? ( दम मारून चिलीम तपासून ) थूः तुझ्या जिनगीवर जंगल्या, गांजाच्या डोक्यावर इस्तूव कुठ हाय ! गांजा मर्द खरा, पन जहाल इस्तवाबिगर गांजा मवाळ भांग होतुया. अन मग त्येचा अंमल बायावानी



**जंग०**—थूः तुझ्या जिनगीवर जंगल्या, गांजाच्या डोक्यावर इस्तूव कुठं हाय!

(पृ. ९२.)

पोचट !-आं हाथ इस्तूव न्हाई, ह्मेबी तुला उमगू न्हव !-हाव इस्तूव कसा गवसल ? ह्या कोन बया येत्याती ह्यांच्याजवळ इस्तूव मांगूया. [ स्थिरमाया व रुद्रमाया प्रवेश करतात. ]

स्थिर०—गडे रुद्रमाये, जंगलामध्यें प्रमिलाराणीसाहेबांचा पत्ता लागत नाहीं, आणखी सेनापति रूपमाया पुरुषराज्यांत निघून गेल्या, ही आतांची वर्दी ऐकून मला कसेंसेंच वाटतें आहे.

रुद्र०—मला वाटतें, आमच्या महाराणीसाहेबांनीं अर्जुनाशीं लग्न करण्याचा मनांत बेत ठरविला असावा. आणि म्हणून रूप-माया सेनापतीसाहेब लग्नाचें बोलणें ठरविण्याकरतां पुरुषराज्यांत गेल्या असाव्यात.

स्थिर०—असें झालें असलें, तर त्यांत कांहीं वाईट नाहीं.

रुद्र०—घरांत पुरुष जर बायकांचे गुलाम होऊन राहयाला तयार असले आणि जनांत त्यांनीं नवरेपणा मिरविला, तर त्यांत बायकांचें तरी काय वेंचतें ?—अगबाई ! खरेंच प्रमिला-राणीसाहेबांनीं लग्नाचा बेत केला असला पाहिजे; नाहींतर इतक्या धिटाईनें हा पुरुष स्त्रीराज्यांत कोणरे तूं ? कोण तूं ?

जग०—हातीं घेउनिया गांजा वी चिलीम । शंकर भोलानाथाचा हा मुनीम । दारोदार हिंडतसे, इस्तूव द्या हो बायांनो ॥

स्थिर०—अरे कोण तूं ? तुझें नांव काय ? ह्या स्त्रीराज्यांत कां आलास ?

जग०—हातीं घेउनिया— पूर्वोक्त )

स्थिर०—गडे रुद्रमाये, ह्यां भाजेकसाला कैद करून सर्व बातमी ह्याच्यापासून काढली पाहिजे.

रुद्र०—आज्ञा सरकार. ( टाळी वाजवून खूण करिते. दोन शस्त्र स्त्रीसैनिक येतात. ) ह्याला गिरफदार करा. ( जंगल्यास धरितात. ) कोण तूं? स्त्रीराज्यांत का आलास?

जंग०—ह्या इस्तुवाच्या पायीं माझ्यावर हा वंगाळ वखत आला न्हवका? शंकर भोलानाथावानी समद्या गांजेकसांनीं समशानांत वसावं, मंग इस्तुवाची चंगळ! नाहींतर इचिभन शंकरावानी मला इस्तुवाचा तिसरा डोळा असता तर येवाना ही चिलीम फुकल्या बिगर राहती?—ए बायांनो, इस्तूव द्या, इस्तूव, उगीच कशापायीं धरलया जनूं?

रुद्र०—तूं येथें कशासाठीं आलास तें सांग, मग तुला विस्तव देऊं.

जंग०—कशापाई? आमच धनीसाव बनराज हात आल्याती नव्ह का? धनीसावास्नी चिलीम तयार करणारा ह्यो जंगल्या नव्ह का? धनीसाव मला काय म्हनत्यात 'बुद्धिमती, वाग्मती, आन संमद इस्तरी सैन्य त्येच्या माग लागूनश्यानी येत्याती.' फितुरी बायास्नी, आन करालमाया, पस्पती, समद्या समद्यास्नी घेऊनश्यानी धनीसाव येत्याती. म्हनूनश्यानी गांजा मळून इस्तूव घ्येऊन मीं हातच ह्या झाडाखालीं वाट बघत बसलुया नव्ह का? इक्त्यामंदी धनीसाव यावं तर रात आली आन म्या पहिली चिलीम फुंकली नव्हव कां? आन काय भुताटकी झाली, रातबी कोनी चोरून नेली—आन इस्तुवबी कोनी चोरून नेला—नव्ह का? दीन कासराभर वर आल्यावर रात चोरून न्येनरा कोन त्ये माझ्या ध्येनांत आलं पन इस्तुव चोरनारा कोन ह्ये उमगना; इक्त्यामंदी आपुन समद्या आवा आल्या नव्हव कां? तवा म्हनतूया जंगल्याला सोडून-

श्यानी बऱ्याबोलानें इस्तूव द्या, न्हाईतर धनीसाब तुमास्नीबी पुरुस-राज्यांत पळवून न्येत्याल.

**रुद्र०**—कायर, तुझा मालक वनराज ह्याला स्त्रीराज्यांत कोणीं पाठविलें ?

**जंग०**—श्येतकेतुमहाराजांनीं. त्यांतलं इंगित आमच्या धनी-साबास्नी संमद ठाव हाय.—पांडवसेना इस्तरी राज्यात घुसलीया. जंगल संमद घ्येरलया –इस्तरीसेनाबी फितूर झालीया.–आन इस्तरी-राज पान्यामंदी ढकललेल्या ढेकळावानीं पांडव सामिंदरांत कवा विर गळतया म्हनून श्येतकेतुमहाराजावानी ह्यो जंगल्याबी गांजा वढत वाट बघतुया.

**रुद्र०**—ह्या जंगल्याला घेऊन चला. विस्तव वगैरे काय पाहिजे तें ह्याला द्या. जा जंगल्या, आम्ही परत आल्यावर तुझी चौकशी करून तुला सोडून देऊं.

**जंग०**—इस्तूव दिल्यावर संमद गुपित सांगन. धनीसाब म्हनत व्हत, अर्जुनमहाराज कवा पर्मिलारानीला इस्तरीराज्यांतून बाहेर उचलून न्येत्याल न्येम न्हाई म्हनूनश्यानी.

**स्त्रीसै०**—चल, चल चौकींत. आम्ही विस्तव देतों, चल.

[ स्त्रीसैनिक व **जंगल्या** जातात. ]

**स्थिर०**—गडे रुद्रमाये, ह्या जंगल्याच्या सांगण्यावरून शिकारीला गेलेलें स्त्रीसैन्य उधळलेलें दिसतें; आतां पुढें कसें करायाचें ?

**रुद्र०**—मला असें वाटतें, आपण पुन्हा राजधानींत जाऊन तेथील सारें सैन्य बरोबर घेऊन जंगलांत परत यावें, आणि तसाच प्रसंग आला तर पांडवसेनेशीं लढण्याच्या तयारीनें जागा धरून बसावें.—माझ्या जवळच्या बाया घेऊन मी प्रमिलामहाराणीचा

शोध काढितें आणि राजधानींतली स्त्रीसेना बिघडली नाहीं, आम्ही लढाई करायाला तयार आहों, अशी त्यांना विनंति करितें.

स्थिर०—हा विचार ठीक आहे. चल, आपण त्याच उद्योगाला लागूं. [ जातात. ]

---

## प्रवेश तिसरा.

---

स्थळः—सरस्वतीनदीचा पूल. प्रमिला प्रवेश करिते.

प्रमि०—प्रेमानें मनांत एकदां घर केलें म्हणजे सर्व मनावर व शरीरावर त्याची सत्ता सुरू झालीच ! प्रेम मनांत उत्पन्न झालें आहे हं समजण्याबरोबरच त्याचा चोहोंकडे अंमल बसला आहे असें आढळून येतें.—पाहिजे तर सर्व सत्ता एकदम कबूल करा, नको तर कांहींच नको, असा आपलाच हेका चालवण्याची शैली प्रेमाप्रमाणें दुसऱ्या कोणच्याही जुलमी राजाला साधत नाहीं. ह्याला तडजोड माहित नाहीं, सवलती ह्याच्या जुलमी राज्यांत मिळत नाहींत, आणि दुसऱ्यांचे हक्क ह्याच्या पायाखालीं तुडविले जातात; उलट ह्यानें गांजलेल्या दुखितांच्या वेदनांमुळेंच ह्याच्या सत्तेला भरती येते.—गुरुमहराज, माझ्या मनांतला हा प्रेमाचा रोग समूळ जर तुह्मांला उपटून टाकतां आला—अगबाई, ही कोण येते आहे ? रुद्रमाया !—राजधानी सोडून येथें कां आली ?

[ रुद्रमाया प्रवेश करते. ]

रुद्र०—मुख्य प्रधान स्थिरमाया ह्यांनीं सरकारला प्रणामपूर्वक विनंति करण्याकरतां मला पाठविलें आहे.

प्रमि०—कोणची विनंति करायची आहे ?—पांडवसेनेबद्दल,

एखादा रथी तूं मनानें वरला आहेस का? आपल्या पतीच्या हातांत हात घालून माझ्यापुढें येऊन मला नमस्कार करून पुरुष-राज्यांत जाण्याची परवानगी तुला पाहिजे आहे का? बोल, रुद्र-माये, बोल, तुझी विनंती काय आहे ती बोल.

रुद्र०—विनंती इतकीच आहे कीं, श्वेतकेतु महाराजांच्या कडून वनराजाचा नोकर म्हणून एक गांजेकस आपल्या राजधानींत शिरला. राजधानींतल्या सर्व स्त्रीसेनेपुढें तो गांजेकस असें बरळला कीं,—मला तें कांहीं खरें वाटत नाहीं,- स्थिरमाया मुख्य प्रधानजी ह्यांचेंही मत माझ्या प्रमाणेंच आहे,—पण त्याच्या बरळण्यानें सर्व स्त्रीसेनेच्या मनाची चलबिचल झाली आहे,—

प्रमि०—तो काय बरळा? कोणची बातमी त्यानें स्त्रीसेनेंत पिकवली?

रुद्र०—सरकारविषयीं आणि रूपमाया सेनापतीसाहेबा-विषयीं—

प्रमि०—रूपमायेविषयीं तो काय बरळला? रूपमाया पुरुषरा-ज्यांत निघून गेली असून—

रुद्र०—हो, हीच बातमी त्यानें सर्व स्त्रीराज्यांत सांगितली. स्त्रि-यांच्या व बातम्यांच्या खरेपणाविषयीं पुरुष दुर्जन ठरत असले, तरी बायकांना स्वतःचा व बातम्यांचा खरेपणा तेव्हांच पटतो. सेनापति रूपमाया पुरुषराज्यांत गेल्या असून सरकारस्वारीकरतां वर म्हणून पांडवसेनेपाशीं अर्जुनाची मागणी करणार आहेत, अशी खात्री सर्व स्त्रीसेनेनें स्वतःच्या मनाची करून घेतली आहे. अशा रीतीनें वराची मागणी केल्यानंतर अर्जुनाला स्त्रीराज्याच्या हवालीं करायला जर पांडवसेना तयार झाली नाहीं, तर पांडवसेनेशीं युद्ध करून आमच्या सैन्यांतल्या प्रत्येक बाईनें एक एक वर पांडवसेने-

तून खेंचून स्त्रीराज्यांत आणण्याची प्रतिज्ञा केली आहे. गांजेकसानें पिकवलेल्या बातमीमुळें स्त्रीसेना अशी खवळलेली आहे खरी; पण माझा व प्रधानजी स्थिरमाया ह्यांचा विश्वास ह्या बातमीवर बसत नाहीं. म्हणून ह्या सर्व हकीकतीसंबंधानें सरकारला विनंती करून सरकारची आज्ञा ऐकून घेण्याकरतां सरकारच्या दर्शनाला मी आले आहे.

**प्रमि०**—रूपमाया पुरुषराज्यांत गेली ही बातमी खरी आहे.

**रुद्र०**—अगबाई! खरेंचका रूपमाया सेनापति उठून गेल्या? ह्यांना जर असें बाहेरच्यापैकीं व्हायचें होतें, तर स्त्रीराज्यांत कशाला आल्या कोण जाणें!

**प्रमि०**—पुष्पधन्व्यासारखा तिला पति मिळाला, ती आपलया पतीच्या घरीं राहयला गेली, ह्यांत तुला कसलें एवढें आश्चर्य वाटतें?

**रुद्र०**—( स्वगत ) अर्जुनमहाराज प्रमिलेला केव्हां नेतील ह्याचा नेम नाहीं असें जंगल्या म्हणत होता; तेंही खोटें नसावें!

**प्रमि०**—कायग, कसला एवढा विचार करते आहेस? तुला जर पुष्पधन्व्यासारखा तुला आवडणारा नवरा मिळाला असतां तर तूं काय केलें असतेंस?

**रुद्र०**—मी त्याच्या घरीं न जातां त्याला माझ्या घरीं आणन गुलाम करून ठेविला असता! मी नाहींग बाई कोणा मेल्या पुरुषाच्या घरीं नांदायला जायची! राजधानींतल्या सर्व सेनेला मी अशी ताकीद दिली आहे कीं, सरकारस्वारीनें अर्जुनमहाराजांना स्त्रीराज्यांत नांदायला आणल्यावर पाहिजे तर प्रत्येकीनें एकएक—

**प्रमि०**—रुद्रमाये तूं, स्थिरमाया, व राजधानींतली स्त्रीसेना ह्यांनीं मिळून एकएक नवरा पकडून आणण्याचा हा बेत कसा व कां केला, ही सर्व हकीगत नदीपलीकडच्या गुहेंत जाऊन गुरुमहा-

राजांना निवेदन कर; आणि गुरुमहाराज काय म्हणतात तें ऐकून घे. अर्जुनाचा वकील येथें इतक्यांत येणार आहे; तो आल्यावर त्याला घेऊन मी गुरुमहाराजांच्या दर्शनाला येणार आहे, अशीही वर्दी पोंचीव.

रुद्र०—आज्ञा सरकार. [ जाते.

प्रमि०—माझ्या धनुष्यावर पाय देऊन त्याचा भंग करून माझा अपमान केला, ह्या अपमानाची भरपाई झाल्याशिवाय मी तुमच्याशीं एक शब्द देखील बोलायची नाहीं, असें मी त्या वकी-लाला मघाशीं बजावलें. थोड्या वेळानें येतों असं सांगून निघून गेला, तो अद्याप कां बरें आला नाहीं ?-प्रमिले, त्यानें लवकर परत यावें अशी तुला उत्कंठा कां झाली आहे ?—माझ्या अपमाना बद्दल त्यानें किती जरी नाकधुऱ्या काढल्या, तरी त्यानें आपलें नांवगांव सांगितल्याशिवाय मी त्याच्याशीं एक शब्द देखील बोलायची नाहीं.—आणि बाई त्यानें आपलें नांव अर्जुनमहाराज असें सांगून माझ्या मनांतला संशय खरा केला,--तर--तर—गुरु-महाराजांच्या पुढें त्याला नेऊन त्यांच्याकडून त्याची फजीती करून गुरुमहाराज माझ्या मनांतला प्रेमांकूर आपल्या ज्ञानाग्नीनें जाळून टाकीपर्यंत मी त्याच्याकडे पहायचीच नाहीं.—अगबाई ! हा तो आलाच.—हा हातांत धनुष्य घेऊन आला आहे. हें धनुष्य म्हाताऱ्या मैत्रेयाच्या गळ्यांत अडकवलेलें मी पाहिलें होतें. माझ्या भंग केलेल्या धनुष्याच्या ऐवजीं हें धनुष्य मला नजर करून माझीं अर्जवें करण्याचा स्वारीचा बेत दिसतो ! हा आपलें खरें नांवगांव सांगेपर्यंत मी ह्याच्याशीं एक शब्द देखील बोलायची नांहीं. [ अर्जुन धनुष्यासह येतो.]

अर्जु०—(स्वगत) कुरुक्षेत्राच्या रणाङ्गणावर कौरवांच्या कित्येक-

योद्ध्यांच्या गळ्यांत जें धनुष्य अडकवून त्यांना जवळ ओढून जीवदान मागायला मी भाग पाडलें, त्याच ह्या धनुष्यांत प्रमिलेला पकडून. तिच्या प्राणांचा मी नाथ झाल्याशिवाय राहयाचा नाहीं.—जगांतल्या सामान्य तरुणी हिऱ्यांची किंवा मोत्यांची माळ नवऱ्यानें घातली असतां त्याच्या चरणीं आपलें जीवितसर्वस्व अर्पण करायला तयार असतात; पण प्रमिलेसारख्या शूर तरुणीपुढें वाग्निश्चयाच्या वेळीं ह्याच दागिन्याची भेट ठेविली पाहिजे.—अरे वा! प्रमिला तर येथें माझी मार्गप्रतिक्षा करीत उभी आहे.—ह्या नजरनजराण्यावर तिची दृष्टि गेली, कीं लागेल आपोआप माझ्याशीं गोडीगुलाबीनें बोलायला.—बा धनुष्या! माझ्या वतीनें बोलण्याचें काम तूं केलें पाहिजेस; तुझ्यावर सर्व भिस्त ठेऊन मी तोंडांतून एक शब्दही काढणार नाहीं.( प्रमिलेच्या किंचित् जवळ जाऊन प्रमिलेकडे टक लाऊन पाहत उभा राहतो. प्रमिला तोंड फिरवून उभी राहते. पण वरचेवर धनुष्याकडे व अर्जुनाच्या नजरेकडे पाहते. )

**प्रमि०**—(स्वगत)कांहीं झालें तरी मी अगोदर बोलायची नाहीं.

**अर्जु०**—(स्वगत) थोडा दम धरला पाहिजे; म्हणजे हिचा नाठा नाहींसा होऊन आपोआप बोलूं लागेल.

**प्रमि०**—(स्वगत) हा अर्जुन आहे का? विचारूं का मी ह्यांना ह्यांचें नांव?—मना, स्वतः गोंधळून जाऊन मला ह्यावेळीं फशी पाडूं नकोस. नाहींच मी ह्यांच्याशीं बोलायची. (अर्जुन टक लाऊन पाहत उभा राहतो.) (उघड) असें निर्लज्जासारखें माझ्याकडे टक लाऊन पाहत कां उभे राहतां? तुम्ही माझी पुष्कळशीं अर्जवें केल्याशिवाय तुम्हाला एक प्रश्नही मी विचारायची नाहीं, हें तुम्हाला माहीत नाहीं का?

**अर्जु०**—प्रमिले, तूं मला प्रश्न विचारण्यापूर्वी तुझ्य व माझ्या

डोळ्यांचें संभाषण एकदांचें संपून जाऊं दे. मन चंचल होऊं देऊं नकोस.—स्थीर समाधिस्त असल्यासारखी दोघांचीही दृष्टि एकमेकांच्या ठिकाणीं खिळून स्तब्ध राहूं दे.—अशी गोंधळून जाऊं नकोस. मला पक्कें माहीत आहे तुझें प्रेम माझ्यावर आहे. हिमाचलासारखी स्थीर हो. अभिमानाला ह्या प्रेमसमाधाचा भंग करू देऊं नकोस. प्रेमामुळें माझा अहंकार नाहींसा होऊन तुझ्या तोंडून निघणारे हुकुमाचे शब्द झेलून धरण्याकरतां ह्या तुझ्या दासानें तुझ्यापुढें गुढघे टेकले आहेत. [गुडघे टेकतो.] विचार, मला कोणचा प्रश्न विचारावयाचा असेल तो विचार.—मन मोकळें करून आज्ञा कर. मीं काल तुझें धनुष्य पायाखालीं तोडून मोडून कां टाकलें, असा रागाचा प्रश्न तुझ्या मनांत विचारायचा आहे? होयना? हो, असेंच.—(उठून) अग, ज्या धनुष्यानें तुझ्या कामल हातांना लष्करी काम करायला लावलें त्या धनुष्याला मी पाय खालीं तुडविल्याशिवाय कसा राहीन? मी ज्यावेळीं तें धनुष्य पायाखाला तुडवून त्याचा भंग केला, त्यावेळींच चापधर प्रमिलेचा अवतार संपला. तुझा बंदासेवक तुझ्या सेवेला हजर असताना आतां ह्यापुढें तुला धनुष्याची काय जरूरी आहे?—अलंकार म्हणून हौसेकरतां तुला धनुष्य जर पाहिजे असेल तर ह्या धनुष्याचा स्वीकार कर. [धनुष्य पुढें टाकतो.] प्रमिले, हें धनुष्य उचलून घेऊन ह्या धनुष्याप्रमाणें माझ्याही विश्रांतीचें स्थान तूं हो. हं, उचल धनुष्य, उचल; प्रेमाची साम्राज्यसत्ता कबूल करण्यांत कोणचा अपमान आहे?

**प्रमि०**—लढाईत जिंकलेल्या वीरांचें धनुष्यबाण हिसकावून घेण्याची मला संवय आहे.

**अर्जु०**—मी झालों तरी पराभूत झालेलाच तुझा दास आहे. माझें धनुष्य हातांत घेण्यांत तुला कमीपणा नाहीं

**प्रमि०**—हिसकावून घेतलेल्या धनुष्यांना मी पायाखालीं तिरस्कारानें तुडवीत असत

**अर्जु०**—पण स्वतःच्या धनुष्याला तूं कांहीं पायाखालीं तुडवीत नाहींस ?

**प्रमि०**—हें कांहीं माझें धनुष्य नाहीं.

**अर्जु०**—माझें म्हणजे तुझेंच धनुष्य आहे.

**प्रमि०**—काल बरें आपण माझें धनूष्य पायाखालीं तुडवलें ?

**अर्जु०**—कालची प्रमिला माझी कोणी नव्हती, पण आतांची प्रमिला माझी—

**प्रमि०**—खबरदार तुम्ही मला एव्हांशींच आपली म्हणाल तर. हें तुमच धनुष्य पायाखालीं तुडवल्या शिवाय माझ्या मनाचें समाधान व्हायचें नाहीं.

**अर्जु०**—तरुणीच्या लाथेचें ताडन तरुणांना प्रिय असतें; पण हें धनुष्य फार पुरातन आहे.–शिवाय तुझा नवरा धनुर्धारी असूं नये, असें कां तुला वाटतें ?

**प्रमि०**—पुरुषांत व बायकांत कांहीं अंतर असूं नये असें माझें मत आहे.

**अर्जु०**—तुझ्यांत व माझ्यांत कांहीं अंतर असूं नये असेंच माझें झालें तरी म्हणणें आहे.

[ **प्रमिला** धनुष्य लाथडण्यास पाय उचलते. लाथडण्यापूर्वी **अर्जुन** धनुष्य उचलून घेतो **प्रमिला** जमिनीवर पाय आदळते, व **अर्जुन** तिच्या गळ्यांत धनुष्य अडकवून आपल्याकडे ओढून घेतो. ]

**अर्जु०**—आतां मला समजलें, तूं इतकी कां रागावलीस तें. ह्या धनुष्याची माळ तुझ्या गळ्यांत घालून तुला माझी अर्धांगी—

माझ्या बरोबरीची-करण्याचें सोडून तुझ्यापुढें मी धनुष्य ठेविलें, ह्या माझ्या चुकीबद्दल रागानें पाय हापटलेसना ?

**प्रमि०**—सोडा मला; मला गुरुमहाराजाकडे जाऊं द्या.

**अर्जु०**—ह्या धनुष्याच्या दोरीनें माझ्याशीं बांधल्या गेलेल्या प्रमिलेनें मंगलकारक माळ गळ्यांत पडण्याबरोबर प्रथम गुरुमहाराजांना नमस्कार करून त्यांचा आशीर्वाद घेतला पाहिजे, हें अगदीं योग्य आहे.

**प्रमि०**—काय पुरुष आपमतलबी पहा, आपल्या पाशांत बायकांना असें पकडून-नका मला आपल्याकडे असे ओढूं-त्या पहा, गुरुमहाराज सत्यमाया इकडेच येत आहेत-त्यांनीं मला असें पाहिल्यावर त्या काय म्हणतील ?-असें ओढूं नका गडे जवळ.—

**अर्जु०**—मी तुझ्या गळ्यांत घातलेली ही माळ सत्यमायेनें पहावी अशी तर माझी मनापासून इच्छा.-ज्यानें गळ्यांत माळ घातली त्याच्यापासून का बायका दूर होत असतात ?

**प्रमि०**—गुरुमहाराज खरोखर आल्या जवळ, असें ओढूं नका गडे. [ **सत्यमाया** पुलावर येते. ]

**सत्य०**—प्रमिले, काय तुझें धाडस हें ! ह्या मेल्याच्या चापाची दोरी तुझ्या गळ्याला ! अग, ती दोरी तुझ्या स्वातंत्र्याचा प्राण घेत आहे बरें प्राण ! तूं आपखुषीनें जर ह्या मेल्याच्या जाळ्यांत सांपडली असशील, तर तुझें दर्शनही मला नको. मी ह्याच पावलीं परत जातें.

**अर्जु०**—सत्यमायाबाई, ज्यांचा मतलब एक झाला, ज्यांच्या आशा, निराशा, सुखदुःख, इच्छा, महत्वाकांक्षा, एकांत एक गुंतल्या गेल्या, मानवाला परम पदाला नेऊन सोडणाऱ्या ज्यांच्या धर्मकल्पना एकजागीं सांगडल्या गेल्या, त्यांना निरनिराळीं शस्त्रास्त्रें घेऊन

काय करायचें आहे ? हिच्या धनुष्याचा भंग करून मी माझें धनुष्य हिला असें अर्पण केलें आहे.

**सत्य०**—पहाग बाई, कसा आपमतलबी आहे. प्रमिले, ह्या वात्रटाच्या वटवटीनें फसून जाऊन तूं पुरी ह्याच्या फासांत सांपडली आहेस. मी येऊन ह्याच्या फासांतून तुला सोडवूं का ?

**अर्जु०**—प्रमिले, तुझ्या व माझ्या प्रेमकलहांत हिला मध्यें पडूं देऊं नकोस. तुला असली माळ घालण्यांत माझा आपमतलब आहे असें जर तुला वाटत असेल तर ही मी तुला सोडून दिली. ( धनुष्य काढून घेतो. ) हें धनुष्य मी तुझ्यापुढें असें टाकतों. ( धनुष्य पुढें टाकतो. ) तुझ्या मनांत जर माझ्याविषयीं प्रेम उत्पन्न झालें नसेल, तर हें धनुष्य पायाखालीं खुशाल तुडव. माझ्याविषयीं तुझ्या मनांत जर खरोखर तिटकारा आला असेल तर ह्या सत्यमायेच्या देखत—

**सत्य०**—तुडव तुडव तें धनुष्य पायाखालीं तुडव.—काय ह्या मेल्याचें धनुष्य पायाखालीं न तुडवतां तूं स्तब्ध उभी राहिलीस? मी स्वतः येऊन तें धनुष्य पायाखालीं तुडवतें.—प्रमिले येऊं मी ?

**प्रमि०**—महाराज, तें धनुष्य उचलून घ्या. गुरुमहाराज त्याचा अपमान केल्यावांचून राहणार नाहींत.

**अर्जु०**—ह्या धनुष्याचा अपमान होऊं नये अशी प्रमिलेची इच्छा असल्यावर कोणाची शक्ति ह्याला पायाखालीं तुडवते तें पाहूं दे.

**सत्य०**—प्रमिले, तें धनुष्य व त्या धनुष्याचा मालक तो मेला पुरुष, त्यांचेपासून बायकांना कांहीं फायदा व्हावयाचा नाहीं.—खुशाल तें धनुष्य पायाखालीं तुडव.

**अर्जु०**—प्रमिले, तुझ्याकरितां जर मी प्राण द्यायला धांवलों नाहीं, तुझ्या संरक्षणाकरितां जर ह्या धनुष्यावर बाण चढला



**प्रमि०**—महाराज, तें धनुष्य उचलून घ्या. गुरुमहाराज त्याचा अपमान केल्यावांचून राहणार नाहींत. ( पृ. १०४. )

नाहीं तर ह्या धनुष्याचा व माझा काय उपयोग ? तूं हुकूम कर तूं सांगशील त्याठिकाणीं तुझ्याकरतां प्राण खर्ची घालायला मी तयार आहे

**सत्य०**—हा आपल्या गोड भाषणांनीं प्रमिलेच्या मनांत मोह उत्पन्न करितो आहे. प्रमिले, ह्याचें धनुष्य पायाखालीं तुडवण्याकरतां ही मी आलें पहा. ( पुलावरून येत असतां पूल पडून नदींत पडते. )

**प्रमि०**—अगबाई ! सरस्वतीच्या प्रचंड प्रवाहांत गुरुमहाराज वाहत चालल्या ! कोणीतरी ह्यांना वर काढाहो

**अर्जु०**—बायकांकरतां पुरुष नेहमीं संकटांत अशी उडी घेतात.

[ नदींत उडी टाकतो. ]

**प्रमि०**—पुरुषांनीं बायकांकरितां संकटांत उडी घेतली असतां संकटाच्या तीरावर बायका स्वस्थ कशा उभ्या राहतील ?

[ उडी टाकते. ]

## अंक चवथा समाप्त.



# अंक ५ वा.

## प्रवेश १ ला.

**स्थळ**—जंगल. **प्रमिला** व **सत्यमाया** येतात.

**सत्य०**—प्रमिले, सरस्वतीनदीच्या भयंकर प्रवाहामध्यें वाहत जात असतांना आदिमायेनें तुला व मला वांचविलें, ह्यांत त्या आदि शक्तीचा कोणता हेतु असावा असें तुला वाटतें ?

**प्रमि०**—गुरुमहाराज, पूल पडून आपण ज्यावेळीं सरस्वतींत वाहून गेलां, त्यावेळीं माझ्या विनंतीवरून त्या वीर पुरुषानें नदींत उडी घेतली; आणि त्याला मदत करण्याकरतां मीही त्याच्या मागोमाग नदींत उतरलें. गुरुमहाराजांचा जीव वांचवावा म्हणून सरस्वतीच्या पुण्योदकांत आम्ही दोघांनीं टाकिलेल्या उड्यामुळें आमच्या आयुष्यांचे प्रवाहही एकत्र व्हावेत, असा जगन्मातेचा हेतु दिसत नाहीं कां ?

**सत्य०**—हें भलतेंच ब्रह्मज्ञान तूं मला शिकवावेंस म्हणून कामी तुला त्या झोंपडींतून येथें घेऊन आलें ? अग त्या मेल्या घटिंगणानें उडी टाकली नसती तरी का आम्ही मरणार होतों ? स्त्रीराज्य ज्या हेतूनें आम्ही स्थापिलें तो हेतु आमच्या डोळ्या देखत तडीस जावा, म्हणून सरस्वतीच्या संकटांतून आमची मुक्तता झाली आहे, समजलीस ?

**प्रमि०**—असें असतें तर त्या वीर पुरुषाच्या हाताचा आश्रय सरस्वतीला साक्षी ठेवून मला कां घ्यावा लागता ?

**सत्य०**—अग तुझ्या मनाची परीक्षा व्हावी म्हणून ?- पुरुषां-संबंधाचा आपला द्वेष अशाही प्रसंगीं जर तुला दाखवितां आला, तर स्त्रीजातीचा उद्धार करावयाला तूं खरोखर लायक आहेस, असें ठरेल.-प्रमिले, तो मेला धटिंगण आम्ही झोंपडींत स्वस्थ विसावा घेत आहों असें पाहून आपणही वृक्षाच्या दाट छायेंत दोन प्रह-रच्या सूर्याच्या तीक्ष्ण किरणापासून आपलें रक्षण करीत स्वस्थ निजला आहे. प्रमिले, तो जागा झाला म्हणजे त्याला समजलं पाहिजे कीं, स्त्रीराज्याच्या महाराणीला पुरुषाच्या असल्या सहा-याची कांहींच किंमत वाटत नसून ह्यापुढेंही पुरुषांच्या मदतीची प्रमिलेला अपेक्षा नाहीं.—ह्याला असेच जंगलांत सोडून निघून गेल्या-शिवाय स्त्रीस्वातंत्र्याची ध्वजा फडकविल्याचें श्रेय स्त्रियांना मिळा-वयाचें नाहीं.

**प्रमि०**—गुरुमहाराज, आपल्या उपदेशाच्या विरुद्ध वागण्यानें माझ्या मनाला अत्यंत क्लेश होत असतात, तरी त्यांना असेच निज-लेले ठेवून इथून निघून जायला मी रुकार द्यावयाची नाहीं.—मी जाऊन त्यांना जागे करितें, त्यांना बरोबर घेऊं, आणि मग राज-धानीकडे जाऊं. ह्या जवळच्या टेकडीवर चढून राजधानीकडे जाणारा रस्ता कोणचा तें नीट ठरवा; इतक्यांत मी त्यांना घेऊन येतें.

[ जात. ]

**सत्य०**—( स्वगत ) एका पुरुषानें माझा जीव वांचविला, त्या पेक्षां ह्या सरस्वतीनें- ह्या स्त्रीनें—मला पाण्यांत बुडवून मारिलें असतें तरी फार बरें झालें असतें. पुरुषजातीकडून यत्किंचितही उपकार बायकांनीं करून घेऊं नये. ह्या मेल्या कसाबांच्या जातीनें उपकारांच्या सुऱ्यांनीं आम्हां गरीब अबलांचे गळे कापले आहेत ! ह्या मायावी राक्षसांनीं प्रेमाच्या रज्जूचे फांस आम्हां बायकांच्या गळ्यांत

लाविले आहेत !—ह्या चुकारतट्टू ठगांनीं लहान मुलांबाळांच्या बिड्या अमच्या पायांत अडकवून घरांतल्या कैदखान्यांत आम्हाला कोंडून ठेविलें आहे!—मुलेंबाळें व्हावींत ही इच्छा आम्ही बायका अशी झुगारून देतों, पुरुषांच्या प्रेमाकडे आम्हीं बायका ढुंकूनही पाहत नाहीं, आणि गाईच्या व्रणांत चोंच मारायला टपून बसलेल्या ह्या मेल्या कावळ्यांना स्त्रीजातीवर उपकार केल्यासारखें दाखविण्याची संधीही मिळूं नये म्हणून आम्हीं बायका स्वःताला पुरुषांच्या सावलीचाही विटाळ होऊं देत नाहीं, अशा तऱ्हेचें आपलें शील बायकांनीं दाखविल्याशिवाय जगांतील पुरुषांची बंडाळी मोडणार नाहीं.—प्रमिलेची व त्या मेल्याची ताटातूट लवकर केली पाहिजे. नाहीं तर आपल्या कार्यभागाला ही प्रमिला उपयोगीं पडेल असें चिन्ह दिसत नाहीं.—प्रमिलेला एकटीलाच त्याच्याकडे मी जाऊं दिलें हेंच अगोदर गैर केलें आपल्या गोड भाषणानें त्यानें प्रमिलेला मोह पाडण्यापूर्वी मला त्यांच्यापुढें जाऊन उभें राहिलें पाहिजे.

[ जाते, ]

---

# प्रवेश २ रा.

---

**प्रमि०**—ज्यांनीं उपकार केले त्यांच्या प्रेमाला पात्र होण्याकरितां खटपट करावयाची सोडून, त्यांनाच उलट शाप द्यावयाला सत्यमाया कशी तयार झाली, ह्याचेंच मला आश्चर्य वाटतं!—हे येथें निजले असतांना ह्यांना येथंच एकटं सोडून आम्ही निघून जायचें म्हणे!—नकोग बाई, असलें पाप माझ्या हातून व्हावयाला नको; मग कितीही जन्म यांच्या पायाची दासी होऊन राहयाचें माझ्या

नशिबीं आलें तरी पतकरलें.—सत्यमायाबाई, हा वीर पुरुष जर काल नसता, तर तुमचे प्राण तरी वाचले असते का ?—केवढी अद्भुत शक्ति ह्या वीराच्या बाहूंत आदिमायेनें ठेविली आहे ! आम्हां दोघींना फुलासारखें हातावर झेलून धरून सरस्वतीच्या प्रचंड प्रवाहाशीं ह्यांची विशाल छाती टक्कर देत असतांना संकटाची मला आठवणही राहिली नाहीं, आणि ह्यांच्या सहवासांत असतांना जन्माला आल्याचें सार्थक झालें असें मला वाटलें.—येथें तीराला लागल्यावर ह्या झोंपडींतलीं कोरडीं वस्त्रें ह्यांनीं आम्हांला कशीं दिलीं, सत्यमाया बेशुद्ध असतांना तिची सेवाचाकरी ह्यांनीं कशी केली, आणि आमची सर्व व्यवस्था लावून आम्ही झोंपडींत विश्रांति घेत असतांना हे येथें कसे झोपीं गेले, प्रमिले, ह्या सर्व गोष्टींचा प्रत्यक्ष अनुभव घेतल्यावर पुरुषांची जात मेली आपमतलबी असते, असें अजून तुला वाटतें का?—इतके दिवस मी सत्य-मायेच्या नादीं लागून भलत्याच मार्गानें चाललें होतें.—देवा पर-मेश्वरा, देवांत देखील पुरुष आणि स्त्री हा भेद मानून मी आजपर्यंत कैलासनाथाचें नांव ह्या जिभेला उच्चारूं दिलें नाहीं,—( गुडघे टेकुन ) विभो शंकरा, धनुर्धर अर्जुन म्हणतात तोच हा वीरपुरुष आहे, अशी आकाशवाणी तूं मला ऐकीव.—ह्या जंगला-तल्या धुंगुरख्यापासून आपल्या चेहऱ्याचें रक्षण करण्याकरितां चेहऱ्यावर पांघरलेला हा शेला दूर करून ह्याचा चेहरा पाहण्या-करितां मी किती उत्सुक झालें आहे ! प्रमिले, सरस्वतीनदीमध्यें ह्यांनीं बायकाकरितां उडी घ्यावी, आणि ह्या जंगलांत जमिनीवर आपलें मस्तक ठेवून हे असे निजले असतां ह्यांचे मस्तक आपल्या मांडीवर घेऊन ह्यांची सेवाचाकरी करावयाला तुला कमीपणा वाटावा अं!—नाहीं, मी माझ्या अहंकाराला वर डोकें काढूं द्याव-

याचीच नाहीं. सरस्वतीनदींत प्रियाच्या हातांनीं मला सांवरून धरलें असतांना व प्रियाच्या मुखकमलाकडे मी प्रेमानें पहात असतांनाच, मी माझा सर्व गर्व नदींत सोडून दिला!–ह्यांचें मस्तक असें मांडीवर घेऊन. पूर्वीच्या प्रमिलेचा अवतार संपला, असें मी ह्यांना जागे झाल्यावर दाखविणार.( मस्तक मांडीवर घेते. ) बा शेल्या, तूं खेरं खेरं सांग हो, अखिल विश्वांत एक वीर म्हणून नांवाजलेले अर्जुनमहाराज ते हेचना ?–नको सांगूस तूं, सांगितलेंस तरी मी ऐकावयाची नाहीं. पुरुष जातीचा तूं, बायकांशीं खोटेंनाटें बोलून तूंही तुझ्या यजमानाप्रमाणें भलतेंच नांव सांगणार होय ? ( **सत्यमाया** येते ) प्रमिले, तुझा गर्व हरण करून तुला आपली भार्या करावयाचें सामर्थ्य अर्जुनमहाराजाशिवाय दुसऱ्या कोणाचे अंगी असणार ?

**सत्य**०—प्रमिले, काय हें बडबडते आहेस ? सरस्वतींत बुडाल्यानें तूं इतकी बेशुद्ध झालीस ? तुला वायुबियू तर झाला नाहींना ? ह्या मेल्याचें मस्तक मांडीवर घेऊन बसावयाला तुला लाज नाहीं वाटत ?

**प्रमि**०—गुरुमहाराज, ज्यांनीं तुमचा सरस्वतींत प्राण वांचविला, पुरुष जातीच्या सद्गुणांचें हें माहेर वर अशी ज्यांनीं मृगयेंत व सरस्वतीनदींत माझी खात्री करून दिली, व इतका वेळ तुमच्या व माझ्या सेवेंत तत्पर राहिल्यानें थकून जाऊन ह्या वृक्षाखालीं जमिनीवर जे निद्रा घेत आहेत, त्यांचा थकवा दूर करण्याकरतां त्यांचें मस्तक आपल्या मांडीवर ह्या आपल्या शिष्यिणीनें सप्रेम घेतलें तर त्यांत काय वावगें झालें ?

**सत्य**०—वावगें ! वावगें म्हणून काय विचारतेस ? सर्वस्वीं वावगें.--अग प्रेम, आदर, उपकार, हीं सर्व ढोंगें पुरुषराज्यांतल्या

गुलाम बायकांना फसविण्याकरितां पुरुष करतात हो! पुरुषांची जात मेली अशी कावेबाज आहे, बायकांनीं आपल्या ताब्यांत रहावें म्हणून पुरुष प्राणही द्यायला मागेंपुढे पहावयाचे नाहींत! अग ह्या मेला दिवसभर खपेल, नानाप्रकारच्या यातना सोशील, मान अपमान कांहीं न पहातां द्रव्य संपादन करून तें सर्व तुझ्यापाशीं आणून ठेवील, पण हें सारें ढोंग कशा करतां? तर तूं गुलाम होऊन अशी ह्याची सेवाचाकरी करावी म्हणून!-देतं मस्तक मांडी-वरून खालीं फेंकून.

**प्रमि०**—गुरुमहाराज, तुमचे व माझे प्राण वांचविण्याकरितां ह्यांनीं सरस्वतीच्या प्रवाहांत जिवापाड मेहनत केली, हें आपल्याला ढोंग वाटतें का?

**सत्य०**—अग तुला फसविण्याकरितां ह्या मेल्याची ही एक युक्ति आहे.

**प्रमि०**—असेल युक्ति! पण ह्यांना उलट फसविण्याकरितां ह्यांच्याशीं प्रेमानें वागून ह्यांचा दुःखभार प्रेमानें असा हलका कर-ण्याचा डाव जर मीं खेळलें तर त्यांत माझा फायदा नाहीं का? प्रेमानें ठकविणारांना प्रेमानेंच उलट ठकविलें पाहिजे, आणि अशा दोन प्रेमी ठकांचा एकजीव झाल्यावर जगांतल्या सर्व दुष्ट मान-वांशीं किंवा दुष्ट वासनांशीं झगडून जय मिळविण्याचें सामर्थ्य ह्या एकजीव झालेल्या आम्हां दोघां प्रेम्यांच्या अंगीं येणार नाहीं का?

**सत्य०**—ह्या मेल्यानें हिच्यावर कांहींतरी जादूच केली असली पाहिजे.-अदिमाये, ह्या जादूंतून तूं प्रमिलेला सोडीव.-कोणरे तूं? असा उद्दाम मांत्रिक तूं कोण?

**अर्जु०**—[ चटदिशीं उठून ] ह्या देहाला अर्जुन म्हणतात.-गुरुमहाराज, मीं प्रमिलेवर जादू केली आहे असें म्हणा किंवा

हिनें आपल्या मंत्रानें मला भारून टाकिलें आहे असें म्हणा.–आयुष्यामध्यें रोजचे रोज दुष्ट वासनांशीं किंवा दुष्ट मानवांशीं कराव्या लागणाऱ्या तंट्यामध्यें स्त्रीपुरुषांनीं एक होऊन पुरुषांच्या छातीच्या ढालेच्या आड बायकांनीं उभें राहून मानवीं उत्कर्षाची परंपरा कायम ठेवण्याचें आपलें पुण्यव्रत जर चालविलें नाहीं, आणि एकटे पुरुष किंवा एकट्या बायका असें जर जन राहूं लागले, तर मानवी जात जगांतल्या दुष्टांना बळी पडेल. दुष्टपणाचा किंवा पापाचा पराभव करण्याचें सामर्थ्य एकट्या बायकांच्या अंगीं नाहीं किंवा एकट्या पुरुषांच्या अंगीं नाहीं.–दोघांचे जीव एक झाले तरच संसारांत पुण्यशक्ति निर्माण होते.–गुरुमहराज, ह्यांत कोणी कोणालाच फसवीत नाहीं.–रोज पापाशीं झगडून मानवांचा उद्धार करण्याचा बोजा जसा पुरुषांनीं स्त्रियांच्या मदतीनें पुढारीपणानें आपल्या अंगावर घेतला आहे, तशी एका आयुष्यांत स्त्रीपुरुषांनीं मिळून संपादलेल्या सद्गुणांची परंपरा पुढें कायम ठेवण्याची कामगिरी पुरुषांच्या सहायानें बायकांनीं आपल्या अंगावर घेतली आहे.–मातेचा मान जर बायकांना आहे तर संसारांत नेत्याचा मान बायकांनीं पुरुषांना द्यावयास नको काय?

**सत्य०**—प्रमिले, ह्याचा पुढारीपणा कबूल करून ह्याची दासी व्हावयाला तूं कबूल आहेस? बोल, स्पष्ट बोल.–तुला जें उत्तर द्यावेसें वाटत असेल तें स्पष्ट दे.–बोल.–आदिमाये, प्रमिलेच्या मनाची चलबिचल होऊं देऊं नको.

**अर्जु०**—प्रमिले, ह्या अर्जुनाची अर्धांगी होण्यापेक्षां स्त्रीराज्याची राणी होण्यांत अधिक सुख व मान आहे का?

**सत्य०**—प्रमिले माझ्याकडे थोडावेळ नीट पहा, आणि शांतपणानें विचार करून उत्तर दे.

अर्जु०—प्रमिले, सरस्वतीनदींत एका हातावर तुला झेलून धरून मी पोहत असतांना ज्या प्रेमाच्या चोरट्या नजरेनें तूं मजकडे पहात होतीस त्याच नजरेनें मजकडे पहा आणि मग उत्तर दे.

सत्य०—हिचा कल अर्जुनाकडे हं!-आदिमाये, तपश्चर्येंतून उठण्याची बुद्धि मला कां दिलीस?-सरस्वतीनदींत पडून मरत असतांना मला कां वाचविलेंस?-प्रमिले, मी तुझ्याजवळ असावें असें तुला वाटतें, का जंगलामध्यें राहून तपश्चर्येंत आपलें सर्व आयुष्य कंठावें असें तुला वाटतें?

अर्जु०—प्रमिलें, मृगयेंत ज्या ह्या हातानें तुला सिंहिणीप्रमाणें पकडून ठेविलें होतें, सरस्वतीच्या प्रवाहांत ज्या ह्या हातानें तुला फुलाप्रमाणें सांभाळलें होतें, त्या ह्या हाताचा स्पर्श जर तुला प्रिय वाटत असेल, तर मला तुझें पाणिग्रहण करूं दे.

सत्य०—मी तुला पाहिजे असेन तर माझ्याकडे ये. आपण दोघीजणी आपल्या राजधानींत जाऊन स्थिरमायेजवळच्या स्त्रीसैन्याला उत्तेजन देऊन ह्या अर्जुनाशीं लढून पांडवसेनेचा पराभव करूं.

अर्जु०—प्रमिले, तुझें धनुष्य जरी मी माझ्या पायाखालीं तुडविलें, तरी तुझा दास म्हणून प्रेमानें तुझ्या पुढें गुडघे टेकावयास मी—हा अर्जुन—तयार आहे; आणि ह्या सत्यमायेचा नाद जर तुला सोडायचा नसेल, तर पुन्हा तुला धनुष्य देऊन, तुझ्याशीं युद्ध करून, दिग्विजयांतला स्वधर्म म्हणून स्त्रीयांना आपल्या बाणांनीं एका बाजूला सारून, अश्वमेधाचा घोडा सोडविण्यासाठी मी—हा अर्जुन—तयार आहें.

सत्य०—जाऊं मी?-अशीं ह्या पावलीं तपश्चर्येला जाऊं?—

जाऊं?–नीट विचार कर.–हें पहा–मी तुला इतकें शिकविलें–प्रमिले–प्रमिले–( **प्रमिला अर्जुनाकडे** जाते. **अर्जुन** तिचा हात धरून घेऊन जातो.) आदिमाये, माझ्या डोळ्यांनीं हें पाहण्यापूर्वी माझे डोळे कां मिटले नाहींत? पुन्हा म्हणून कोणत्याही बाईला मी माझी विद्या शिकवावयाची नाहीं.—मी आतां अशी जंगलांत तपश्चर्येला जाते. पुरुषांचा गर्व परिहार करून पुरुषांना दाईप्रमाणें राबविण्याचें सामर्थ्य सर्व स्त्रीजातीच्या मनगटांत येईपर्यंत, मी माझें तपश्चर्येचें आसन सोडणार नाहीं.

---

## प्रवेश ३ रा.

[ **जागरूक** व **मैत्रेय** तोंड फिरवून ऐकेका बाजूनें प्रवेश करतात. ]

**मैत्रे०**—जागरूक कोठें दिसत नाहीं; त्यानेंही सरस्वतीनदींत जीव दिला कीं काय?

**जाग०**—मैत्रेय नदींत बुडाला का हिंस्र पशूंनीं त्याला खाऊन टाकले, कोठें पत्ता लागेल? अश्वमेधाचा घोडा ह्या जागरूकानें पकडून आणला ह्या बातमीनें सर्व पहाड दुमदुमत आहेत, ह्यावेळीं तो मैत्रेय जर ज़िवंत असता तर माझ्यापाशीं खुषी मागण्याकरितां आल्यावांचून राहतांना!–फार चांगला होता ब्राह्मण!

**मैत्रे०**—जागरूक मेला असतांना पांडवसेनेला मी कसें तोंड दाखवूं, म्हणून मी असा तोंड लपवून उलटा चाललों आहे.—चुकून जर अर्जुनमहाराजांची गांठ पडली तर जागरूकाशिवाय मी त्यांना कसें तोंड दाखवावें?–गरीब बिचारा जागरूक!

**जाग०**—मैत्रेय मरून पिशाच्च होऊन उलट्या पायांनीं जरी पृथ्वीवर संचार करूं लागला, तरी अश्वमेधाचा घोडा परतून आणल्याची बातमी कळल्याबरोबर ह्या विजयोत्सवाचे वेळीं होणाऱ्या ब्राह्मणभोजनामध्यें पिशाच्चरूपानें हजर झाल्यावांचून तो राहणार नाहीं. [ दोघे एकमेकांजवळून जातात. ]

**मैत्रे०**—तूं पिशाच्च का मी पिशाच्च ?

**जाग०**—जिवंत कोण ? तूं का मी ? तूं उलट्या पायांनीं चालतो आहेस खरा, पण तुझ्या शरीराला पायाप्रमाणें तोंड, हात पोट, सर्व अवयवही उलटेच चिकटविल्यासारखे दिसतात ! तूं खरोखर पिशाच्च आहेस का पिशाच्चाचें सोंग आणलें आहे ?

**मैत्रे०**—तूं मेलेला नाहींस ना ? मग ह्या जंगलांत तुझीन् माझी ताटातूट कशी झाली ?

**जाग०**—तूं खरोखर जिवंत असलास, मेला नसलास, तर मी तुला सांगतों.–त्याचें असें झालें, अर्जुनमहाराजांनीं बायको मिळत नाहीं म्हणून नदींत जीव दिला. ही बातमी ऐकून तूं बेशुद्ध होऊन पडलास, होयना ?

**मैत्रे०**—मालकांनीं जीव दिल्यावर मी आपला कसा ठेवूं ? म्हणून मी देखील जमिनीवर जीव सपशेल फेंकून दिला.

**जाग०**—तुला असें मरतांना पाहिल्यावर तुझ्या डोक्यावर पाणी शिंपून तुला जिवंत करावें म्हणून मी पाणी आणावयाला नदीकडे गेलों—

**मैत्रे०**—तूं केव्हां येतोस म्हणून मी चोरट्या नजरेनें मेलेलाच पडून पाहत होतों, पण तूं लौकर कांहीं येईनास असें पाहून मला वाटलें तूं नदींत जीव दिलास. मग निरुपाय होऊन आपण होऊ-

नच जिवंत झालों, आणि तुझ्या नावानें शोक करीत असा पुरुष-
राज्याकडे चाललों.

जाग०—मी परत येऊन पाहतों तों तूं नाहींसा झालेला!—
एखाद्या वाघानें खाऊन टाकलें असें समजून मी पुरुषराज्याकडे
यावयाला निघालों, तों अश्वमेधाच्या घोड्याची आणि माझी गांठ
पडली ! लगेंच त्याच्या लगामाला धरून खेंचून त्याला आणला.

मैत्रे०—आं-हा घोडा अखेरीस तुझ्याच हातीं कसा पडला.

जाग०—शिकारीला आलेलें स्त्रीसैन्य उधळल्याची बातमी
ऐकून राजधानींत असलेली स्त्रीसेना बरोबर घेऊन स्थिरमाया बाहेर
पडली; आणि अर्जुनमहाराज व पुष्पधन्वामहाराज ह्यांना स्त्री-
राज्यांत बायकांनीं नदींत ढकलून दिल्याची बातमी ऐकून खवळ-
लेली पांडवसेनाही स्त्रीराज्यांत घुसली. हीं दोन्ही सैन्यें हातघाईला
येणार इतक्यांत,—तेथ पातला हा धीरू । मग झाला चमत्कारू ॥
सर्व लागले आवरू । धनुष्य बाण आपुले ॥

मैत्रे०—मग काय लढाईच झाली नाहीं ?

जाग०—निरखोनी स्त्रियांना सामोरे । सर्व होती कावरे बावरे ।
स्त्रीसैन्य पदर सावरे । ऐसें युद्ध मातलें ॥ रणीं सैन्य तटस्थ बसे ।
त्या वारूसी कोण न पुसे । जागरूक हळूच घुसे । लगाम हाती पक-
डला ॥ मग झाला हाहाःकारू । तो अर्जुन धनुर्धरू । प्रमिला शौर्य-
सागरू । तेथ पातली ॥ माजेल रण घनघोरू । कांपे जागरूकऊरू ।
जाईल हातीचा वारू । पळत मी सूटलों ॥

मैत्रे०—अर्जुन प्रमिलेचें युद्ध तूं पाहिलेंसच नाहीना ?

जाग०—कवी ह्मणे हें वर्णन । करीन मी मागाहून । श्वेत-
केतूचें दर्शन । घ्यावया आतां चलावें ॥ [ जातात ]

---

# प्रवेश ४ था

---*---

**श्वेतकेतू** व **पुरोहित** प्रवेश करतात

**स्थळ—श्वेतकेतूची** छावणी

**श्वेत०**—पुरोहितजी, प्रमिलेकडची कांहीच बातमी न आल्यामुळें मनाला काळजी वाटते आहे.—प्रामिलेचें व अर्जुनमहाराजांचें लग्न लावून देऊन हें माझें राज्य प्रमिलेच्या मुलांकरितां पांडवांच्या स्वाधीन करून माझ्या वाडवडिलांनीं पत्करलेला तपश्चर्येचा मार्ग वृद्धावस्थेंत मी केव्हां आक्रमीन असें मला झालें आहे.

**पुरो०**—महाराज, ह्या संसारांत राहून अखेरपर्यंत कर्मे आचरून इतरांचा संसार सुखावह करण्यामध्यें जें परोपकाराचें सुख आहे, त्याहून अधिक आनंद स्वतःच्या एकट्याच्या उन्नतीकरितां आंगिकारलेल्या तपश्चर्येंत आहे का ?

**श्वेत०**—पुरोहितजी, माझ्या वाडवडिलांनीं संन्यासवृत्ति पत्करून जी पतश्चर्या केली, ती त्यांच्या एकट्याच्या उन्नतीकरितां --स्वताःच्या स्वार्थाकरितां-होती, असें का आपणाला वाटतें ? अरण्यवास, तपश्चर्या, किंवा संन्यास, हीं झालीं तरी कर्मेंच आहेत.—हीं कर्मे आचरावयाला कोणता पुरुष लायक होतो सांगा पाहूं.

**पुरो०**—सरकार, संसारांत राहून संसाराचीं कर्मे करीत असतांनाच संन्यासवृत्तीची तपश्चर्या चालवितां येतें, तेव्हां राज्य सोडून —संसार सोडून—अरण्यांत किंवा कोठेंही एकांतवासांत राहण्याचें कारणच नाहीं, असें मला वाटतें.—संसारांतल्या परोपकाराची दगदग ज्यांना सोसवत नसेल, त्यांनीं पाहिजेतर स्वार्थबुद्धीनें एकांतवास पत्करावा.

**श्वेत०**—परोपकाराची दगदग न सोसल्यामुळें किंवा संसारी लोकांच्या उपयोगी पडण्यांत आनंद न वाटल्यामुळें साधुसंत एकांतांत राहतात असें का तुम्हाला वाटतें? पुरोहितजी, प्रत्यक्ष कृतीची किंवा उपदेश करण्याचीं नाना प्रकारचीं कर्में करून लोकांच्या उपयोगी हें शरीर पडत असतें. पण कालांतरानें शरिराच्या ताकदीची ही वाढ खुंटल्यानंतर विश्वासाच्या गूढाचें ज्ञान शिकण्यास प्राणी लायक होतो. नुसत्या मानवजातीच्या नव्हे तर अखिल विश्वासाच्या उपयोगी पडण्याची शक्ति अंगीं यावी म्हणून, ह्या वृद्धावस्थेंतल्या प्राण्यालाही अधिक ज्ञान संपादण्याकरितां लहान मुलांना ज्याप्रमाणें गुरुगृहीं पाठवावें लागतें त्याप्रमाणें—एकांतवासांत तपश्चर्येला जाणें जरूर पडतें.—दृश्य संसाराला उपयोगी पडणारी विद्या शिकविण्याचे दिवस जसे लहानपणीं असतात, त्याप्रमाणें अदृश्य विश्वालाही उपयोगी पडणारें ज्ञान संपादन करण्याचे दिवस म्हातारपणीं येतात. वृद्धावस्थेंत संसारांत पुन्हा गुटमुळणारा म्हातारा, व लहानपणीं शाळा चुकवून खेळांत मग्न असणारा मुलगा, हे दोघेही ज्ञान्याच्या दृष्टीनें सारखेच अपराधी होत.—ह्या करितां पुरोहितजी, प्रमिलेचा हात अर्जुनमहाराजांच्या हातांत देऊन ह्या संसारपाशांतून मी केव्हां मुक्त होईन, असें मला झालें आहे.

[ एका बाजूनें **पशुपति, वनराज,** व **रुद्रमाया** प्रवेश करितात, व दुसऱ्या बाजूनें **जागरूक, मैत्रेय** व **स्थिरमाया** प्रवेश करतात. ]

**पशु०**—आन् कोतवालसाव, हात मला पकडायला आला व्हय? हे इस्तरीराज्य नव्ह, पुरुसराज्य हाय.

**मैत्रे०**—मग काय अर्जुनप्रमिलेचें युद्ध झालेंच नाहीं!

**जाग०**—लढूं नका, एवढेंच सांगून प्रमिलेला घेऊन अर्जुन-महाराज निघून गेले.

**पशु०**—सरकार, हा बायकी कोतवाल तुम्हां आम्हां समद्या पुरुषासनी पकडायला आला हाय.

**मैत्रे०**—ह्याच कोतवालनें आम्हाला पहिल्या दिवशीं कैद केलें.

**जाग०**—आज श्वेतकेतुमहाराजांचीं पत्रें आपल्यापाशीं नाहींत. पण प्रत्यक्ष श्वेतकेतूमहाराजच आहेत. अहो कोतवालसाहेब, महा-राजांनीं प्रत्यक्ष नको म्हटलें तरी आमचा कडेलोट करणार का ?—कांहींच्या सहीनें जें काम होतें तें प्रत्यक्ष जाऊन होत नाहीं, म्हणून विचारतों.

**श्वेत०**—वा ! पुरोहितजी, ही स्थिरमाया !–या प्रधानजी.–ही रुद्रमाया !–या कोतवालसाहेब.–स्थिरमाये तुझें कुशल आहेना ? माझी बाळी प्रमिला व तिची मैत्रीण रूपमाया ह्यांची हकीगत ऐका-वयाला मी उत्सुक झालों आहे.

**रुद्र०**—पुष्पधन्वामहाराज, आणि रूपमायाबाईसाहेब, सर-कारच्या दर्शनाला आतां इतक्यांत येणार आहेत. ही वर्दी सरका-रच्या पायापाशीं कळविण्याकरितां मला त्यांनीं पुढें पाठविलें आहे.

**श्वेत०**—स्थिरमाये, प्रमिलेची काय खबर आहे ?

**स्थिर०**—दादा, ती पहा,—रूपमाया व पुष्पधन्वा इकडेच येत आहेत. प्रमिला व अर्जुन ह्यांची खबर ते सरकारला निवेदन करतील.

[ **पुष्पधन्वा, रूपमाया** व **वाग्मती** प्रवेश करतात. ]

**पुष्प०**—पांडवसेनेचा सेनापति आपल्या अर्धांगीसह सरकारला प्रणाम करतो आहे. [ **पुष्पधन्वा** व **रूपमाया** नमस्कार करतात. ]

श्वेत०—शतायुषी हो.–अष्टपुत्रा सौभाग्यवती हो.–रूपमाये, अशी जवळ ये.–बायकांच्या स्थितिसंबंधाच्या भलत्याच कल्पना तुझ्या मनांतून नाहींशा होऊन, योग्यवराशीं तूं संलग्न झालेली पाहून, मला फार आनंद होत आहे. पतिप्रेमानें, आपत्यप्रेमानें, आणि धर्मनिष्ठेनें तुझा संसार चालूं दे. असल्या संसारीं बायकांना जगांत आपली योग्यता पुरुषांहून श्रेष्ठ ठरवून घेतां येते. रूपमाये, पुष्पधन्व्याशीं लग्न लावल्यानें तूं गृहिणीच्या अत्यंत सन्माननीय पदाला चढली आहेस. पुष्पधन्व्याच्या सुखदुःखाची तूं वांटेकरीण झाली असून, सेनापतीच्या दर्जाचा त्याच्या मस्तकावरचा भार तुझ्या सल्लामसलतीनें हलका झालेला पाहिल्यावर, आणि सुखोपभोगाच्या वेळीं तुझ्या सहवासानें त्यांचा आनंद द्विगुणित झालेला दृष्टीस पडल्यावर, रूपमाये, तुला तुझ्या स्त्रीराज्याच्या सेनेची आठवणच व्हायची नाहीं. आणि यदाकदाचित् झालीच तर लहानपणाच्या भातुकलीच्या गोष्टी बरोबरच ह्या स्त्रीराज्यांतल्या गोष्टी तूंही आपल्या मुलांमुलींना सांगत बसशील.—पुष्पधन्वामहाराज, अर्जुमहाराजांची काय खबर आहे ?

पुष्प०—सरकार, गुरु सत्यमाया हिच्या देखत प्रमिलेनें अर्जुनमहाराजांना वरण्याचें कबूल केल्यावर प्रमिलेला घेऊन अर्जुनमहाराज पांडवसेना व स्त्रीसेना ज्याठिकाणीं लढण्याकरितां भिडणार होती त्याठिकाणीं प्राप्त झाले. इतक्यांत मी व रूपमायाही तेथें जाऊन पोहोंचलों.–स्त्रीराज्य मोडण्याचा प्रमिलामहाराणीचा निश्चय त्याठिकाणीं सर्व सैनिकांना जाहीर करून आम्ही चौघेजण सरकारच्या दर्शनाला यायला निघालों–ज्या गुहेंत सत्यमाया तपश्चर्येला बसली आहे त्या गुहेवरून आमची वाट असल्यामुळें प्रमिला व

अर्जुन सत्यमायेच्या दर्शनाला गेली आणि आपले जामात बायकांचें बंड मोडून आपल्या दर्शनाला येत आहेत, हें कळविण्याकरितां आम्ही दोन पावलें पुढें आलों.

**वाग्म०**—सरकार, अशा रीतीनें हें स्त्रीराज्य मोडलें; आतां घरांतल्या घरांत लहानसहान बंडें करून नवऱ्यांना वठणीला आणण्याशिवाय आम्हां बायकांना दुसरा मार्ग उरला नाहीं. ( पडद्यांत शिंगें वाजतात. **अर्जुन** व **प्रमिला**, त्यांच्यावर दोघी दासी चवऱ्या वारीत आहेत, असे प्रवेश करितात. )

**अर्जु०**—प्रिये प्रमिले, सत्यमायेच्या बोलण्याचा विषाद मनाला वाटूं देऊं नकोस.-हे पहा तुझे वडील श्वेतकेतु महाराज, ह्यांचें दर्शन झालें व ह्यांची बोधामृताचीं वचनें तुझ्या कानीं पडलीं म्हणजे सत्यमायेशीं होणाऱ्या ह्या विरहाची तुला आठवणही रहावयाची नाहीं.-श्वेतकेतुमहाराज, आपल्याला वचन दिल्याप्रमाणें बायकांचें बंड मोडून आपला जामात होण्याकरितां आपल्या मुलीला बरोबर घेऊन हा अर्जुन आपल्या दर्शनाला आला आहे. ( **अर्जुन प्रमिला** प्रणाम करतात. **श्वेतकेतू** आशीर्वाद देतो. )

**श्वेत०**—अर्जुनमहाराज, प्रमिलेचें मन वश करून घेऊन स्त्रीराज्यांतून तिला बाहेर काढून आपली अर्धांगी होण्याचें तिच्यापासून आपण वचन घेतलें, हे माझ्यावर मोठे उपकार आहेत. मुली म्हणजे त्यांच्या नवऱ्याच्या ठेवी म्हणून बापाजवळ असतात; आणि अर्जुनमहाराज, अश्वमेधाच्या निमित्तानें आपली ठेव मागायला आपण ज्यावेळीं येथें आला त्या वेळेला—भूमींत पुरून ठेवलेलें द्रव्य जसें हळूंच दुसरीकडे सरकावें त्याप्रमाणें—प्रमिला माझ्यापासून सत्यमायेनें पळवून नेलेली होती. म्हणून आपल्या ऋणांतून

मी मुक्त कसा होतों ह्याची मला काळजी पडली व आपली ठेव आपणच शोधून घ्यावी असें आपल्याला सांगणें मला भाग पडलें. अर्जुनमहाराज ही आपली अमोलिक ठेव स्वतः हुडकून काढण्याचे आपण श्रम घेतले, आणि मला ऋणमुक्त केलें, ह्या आपल्या उपकाराचा उतराई मी कसा होऊं, हेंच मला समजत नाहीं. तथापि अंशतः तरी उतराई होण्याकरितां मी माझ्या राज्याबरोबरच ह्या माझ्या मुलीचा हातही आपल्याला अर्पण करतों.—आतां आपण सर्वजण आमच्या राजधानीकडे जाऊन लग्नसमारंभाचे बेत ठरवूं.

समाप्त.

